मुंबई इलाख्यांतील सरकारी शाळाखातें

# वृत्तदर्पण


के॰ रा॰ रा॰ परशुराम बल्लाळ गोडबोले

ह्यांनीं केलें, ते

पुणें येथील

ट्रेनिंग कॉलेजचे व्हाइस–प्रिन्सिपॉल

ह्यांनी शोधिलें व

विष्णु वासुदेव नाटेकर

यांनी सुधारून वाढविलें



आवृत्ति तेविसावी

सुरत

करसनदास नारणदास आणि सन्स

इसवी सन १९३९

किंमत ३½ आणे

# प्रस्तावना



कवितेचा म्हणजे पद्यरूप रचनेचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांस, तिच्या छंदाचे जे प्रकार आहेत, त्या प्रकाराचे व त्यांच्या भेदांचें ज्ञान अवश्य असलें पाहिजे त्याचे ज्ञान नसले तर प्राचीन कवीच्या व अर्वाचीन कवीच्या कविता पाहण्यास किंवा नवीन कविता करण्यास मोठी अडचण पडते.

कवितेचे प्रकार संस्कृत भाषेत विद्वानांनी लिहून ठेविले आहेत; परंतु संस्कृत भाषा शिकल्यावांचून ते समजावयाचे नाहीत तेच प्रकार प्राकृत कवींनी आपल्या कवितेत घेतले आहेत. तरी संस्कृत ग्रथांत जितके प्रकार सांगितले आहेत, तितके त्यांनी घेतले नाहीत, असे त्याचे ग्रथ पाहिल्यावरून समजते.

ह्या विषयावर प्राकृत भाषेत झालेला ग्रथ प्रसिद्धीस आला नाही. तो अवश्य असावा असे मनांत आणून विद्यार्थ्यांस वृत्ताची साधारण माहिती थोडक्यात होण्याकरिता संस्कृत ग्रथाच्या आधारानेच हा लहानसा पद्यात्मक प्राकृत ग्रथ केला आहे. ह्यात सस्कृतातल्या प्रमाणे वृत्ताचे प्रकार घेतले नाहीत. प्राचीन कवींचे बहुतेक पद्यात्मक ग्रथ पाहून त्यात वृत्ताचे व छदाचे जे जे भिन्न भिन्न प्रकार आढळले त्याचा मात्र येथे संग्रह केला आहे

ह्या लहानशा ग्रंथाचा जे कोणी लक्ष लावून अभ्यास करितील त्यांस वृत्तांविषयी बरीच माहितगारी होईल, किंबहुना पद्यरूप नवी कविता शुद्ध रीतीनें करण्याची शक्ति येईल.

हा ग्रंथ निर्दोष असेल असे म्हणवत नाही; कोठे कोठे दोष राहिले असतील; तथापि नवीन कृतीकडे लक्ष देऊन सज्जन क्षमा करतील असा भरंवसा आहे.

आर्या

कविता असो कशी, तरि । तात्पर्यावरिच सज्जनीं दृष्टी ॥
द्यावी, तेणें होवो । बालोक्ते जेविं, तन्मनस्तुष्टी ॥ १ ॥

**परशुराम बल्लाळ गोडबोले**

# बाराव्या आवृत्तीची प्रस्तावना.



या आवृत्तींत **वियोगिनी** छदाचें लक्षण नवीन तयार करून पृष्ठ ३५ च्या टिपेत दाखल केलें आहे. मुद्दयाचे शब्द जाड अक्षरात घातले आहेत. प्रकरणें वेग-वेगळी दाखविण्याकरिता प्रत्येक प्रकरणाच्या शेवटी रेघा दिल्या आहेत, व छंदांचीं लक्षणें स्पष्ट होण्याकरितां गणांची अक्षरे सर्व पुस्तकभर जाड अक्षरांत घातली आहेत. आठ अक्षरी, नऊ अक्षरी, दहा अक्षरी इत्यादि छद वेगळे दाखविण्याकरितां प्रत्ये-काच्या शेवटी रेघा मारल्या आहेत. अलीकडे ग्रंथ पुष्कळ होत आहेत, परंतु त्यांतील कमीजास्तीपणाकडे लक्ष कोणाचेंच पोहोंचत नाही ही दु.खाची गोष्ट आहे अलीकडे प्राकृत कवितेंत वियोगिनी छंदाशिवाय बरेच छंद येऊं लागले असावे असा आमचा तर्क आहे, तरी ते कोणकोणते व त्यांची लक्षणे काय ती उदाहरणासहित आमच्या-कडे पाठविल्यास पुढील आवृत्तींत त्यांविषयी विचार अवश्य केला जाईल.

पुणें, ट्रेनिंग कॉलेज,
तारीख १७ माहे जुलै,
सन १८९४ इसवी.

**ना. बा. गोडबोले,**
व्हाइस-प्रिन्सिपॉल

# एकोणिसाव्या आवृत्तीची प्रस्तावना

या आवृत्तींत पुष्कळच फेरफार केलेले आहेत. ते असे:—(१) वृत्ताच्या अक्षर-संख्येवरून व मात्रा छंदांच्या मात्रा-संख्येवरून संस्कृतांतल्याप्रमाणें त्यांच्या त्यांच्या जाति दिल्या आहेत. (२) अक्षर-गण-वृत्तांस व मात्रा-गण-वृत्तास संस्कृतांतल्या-प्रमाणेंच अनुक्रमे "**वृत्त**" आणि "**जाति**" अशी नांवें दिली आहेत. (३) अलीकडे आधुनिक कवींनीं पुष्कळच नवीन छंद:प्रकार उपयोगांत आणिले आहेत. कवितेच्या शरीर-वर्धनाबरोबरच तिचीं वस्त्रेंही पुष्कळ व निरनिराळ्या प्रकारचीं होणें जरूर आहे; अर्थात हे नवीन छंद:प्रकार आवश्यक होत, हें उघड आहे. या सर्व नवीन छंदांचें वृत्त–दर्पण तयार होणें जरूर झालें आहे. प्रस्तुत आवृत्तीत या नवीन प्रकारापैकीं वारंवार उपयोगांत आलेले असे कांहीं प्रकार मात्र संग्रहीत केले आहेत नवीन नवीन होणारे छंद:प्रकार हे मात्राछंदाचेच आहेत. ते सर्व न घेण्याचें कारण इतकेंच कीं, हें पुस्तक प्राय: विद्यार्थिवर्गासाठी असल्यामुळें त्याची पृष्ठसंख्या विशेष वाढविणें इष्ट नाहीं. (४) संस्कृत–मात्रा-छंदांचीं (आर्यादिकांचीं) लक्षणें पूर्वीच्या आवृत्तीतून अपूर्ण होतीं, त्यांत फक्त प्रति–चरणांतील मात्रा–संख्याच दिलेली होती. प्रत्येक चरणांतील मात्रा–संख्या कशी तरी पुरी केली म्हणजे तो तो छंद:प्रकार रचनेनें व म्हणण्याच्या सौकर्याच्या दृष्टीनें पूर्ण झाला असें होत नाहीं, ही अडचण पुष्कळांस भासली असेलच. हा अपूर्णत्वाचा दोष या आवृत्तीत शक्य तितका काढून टाकिला आहे. (५) अनुष्टुभ् व ओंवी याही वृत्तांच्या लक्षणांत अधिक माहिती घातली आहे. (६) कांहीं ठिकाणीं वृत्तांचीं पूर्वीच्या आवृत्तींतील उदाहरणें वगळून त्यांऐवजी दुसरीं नवीन व प्राथमिक शाळांतील मुलांनी वाचण्यास योग्य अशीं उदाहरणें घातली आहेत. (७) कांहीं विशेष प्रचारांत नसलेलीं अशी वृत्तें गाळलीं आहेत. पूर्वीचाच दृष्टांत चालू ठेवून म्हणावयाचें तर कवितेच्या लहानपणींचीं, अर्थात् अपुरीं झालेलीं वस्त्रें फेकून दिलीं आहेत. (८) सर्व बालबोध क्रमिक पुस्तकांतील बहुतेक सर्व पद्यांच्या वृत्तांचीं लक्षणें या आवृत्तींत आणिलीं आहेत. (९) पूर्वीच्या आवृत्तींतील परिशिष्टांतील वृत्तें योग्य स्थळीं दाखल केलीं आहेत. (१०) दोन वृत्तांमधील संबंध, जेथें जेथें शक्य तेथें तेथें दाखविला आहे. यांशिवाय आणखीही बरेच किरकोळ फेरफार केले आहेत.

अशा रीतीनें या आवृत्तीत आमूलाग्र फेरबदल करून ती शक्य तितकी पूर्ण व बरोबर करण्याचा प्रयत्न केला आहे.

**नवीन प्राकृत वृत्तांची** माहिती देतांना **प्रो. मा. त्रिं. पटवर्धन ऊर्फ "माधव जूलियन्"** कवि यांच्या लेखाची फार मदत झाली. त्याचप्रमाणें **मात्रासमक** या छंदाची माहिती देतांना के० वे रा रा. **गणेशशास्त्री लेले** याच्या **साहित्यशास्त्र** या पुस्तकाचा उपयोग झाला. त्याचप्रमाणें कांहीं नवीन वृत्तांची उदाहरणे आधुनिक कवींच्या काव्यांतून घेतली आहेत सबब त्या त्या ग्रंथकारांचा व कवींचा मी फार आभारी आहे

या नवीन आवृत्तीसाठी हे पुस्तक मजकडे देताना मे प्रिन्सिपॉल साहेब, ट्रेनिंग कॉलेज फॉर मेन, पुणे, यांनीं इष्ट सुधारणांच्या सूचना केल्या, याबद्दल मी त्याचाही फार आभारी आहें.

शेवटीं ही नवीन आवृत्ति विद्यार्थिवर्ग व रसिकजन याच्या आदरास पात्र होवो, अशी परमेश्वराजवळ प्रार्थना करून ही प्रस्तावना पुरी करितों.

**पुणें.** मिति आषाढ शु. ५, शके १८४६. तारीख ७ माहे जुलै सन १९२४.

**विष्णु वासुदेव नाटेकर**

रिटायर्ड असि. डे. ए. इन्स्पेक्टर

# उपोद्घात

## श्लोक

नमूनि देवदेवातें । [१]रसिकस्वांततर्पण ॥
बालबोधार्थ करितों । अल्प हें[२] वृत्तदर्पण ॥ १ ॥
छंदें वृत्तें संस्कृतांत । वर्णिलीं असती मुळीं ॥
पाहून त्याच रीतीनें । देश[३]भाषेंत सांगतों ॥ २ ॥

काव्य दोन प्रकारचें आहे; एक **गद्यरूप** आणि एक **पद्यरूप**. ज्याला पाद[४] किंवा चरण नाहींत तें **गद्य** आणि ज्याला पाद आहेत तें **पद्य**. पद्याच्या अक्षरनियमाला व मात्रानियमाला अनुक्रमे **वृत्त** व **जाति** असे म्हणतात. छंदांविषयीं संस्कृत भाषेत **पिंगलादिकांनीं** नियम सांगितले आहेत, ते प्राकृत जनांस समजण्याकरितां त्याच नियमाच्या आधारानें त्यांचीं [५]लक्ष्यलक्षणे महाराष्ट्रभाषेत पद्यरूपानें सांगतो.

## गीति

छंदःशास्त्रीं जितकीं । छंदें वृत्तें सुवर्णिलीं असती ॥
तितकीं प्राकृत भाषे- । मध्यें कोणींहि घेतलीं नसती ॥ ३ ॥
प्राकृत कविनीं जीं जीं । वृत्तें पाहोन घेतली गोडी ॥
तीं तींच वर्णितों मी । येतिल बहुतेक, राहतिल थोडीं ॥ ४ ॥

संस्कृत भाषेंत छंदाचे प्रकार बहुत आहेत, म्हणजे एक अक्षराचा पाद, दोन अक्षरांचा पाद, तीन अक्षरांचा पाद, असे चढत चढत सव्वीस अक्षरांच्या पादापर्यंत छंद सांगितले आहेत. परंतु प्राकृत भाषेंत तितके प्रकार प्रसिद्ध नाहींत.

१ रसिक जनांच्या हृदयास तृप्त करणार. २ संस्कृतात 'दर्पण' हा शब्द पुल्लिंगी असून एथे नपुंसक केला आहे ३ महाराष्ट्रभाषेत. ४ पृष्ठ १२ वरील खालून दुसरी ओळ पहा. ५ उदाहरणे व लक्षणे.

एका अक्षरापासून सात अक्षरांपर्यंत चरणाचे छंद येथे घेतले नाहींत, आठ अक्षरांच्या चरणापासून तेवीस अक्षरांच्या चरणापर्यंत मात्र छंद एथें घेतले आहेत.

## गीति

मात्राक्षरसंघाच्या । रचनेला जाति वृत्त वा वदतो ॥
मात्राक्षरगणभेदीं । भेद तयाचे अनेक ते होती ॥ ५ ॥

चरणांचीं अक्षरे सारखीं असून गण[1]भेदांनीं वृत्तभेद पुष्कळ होतात. त्यांतून प्रसिद्ध वृत्तें मात्र एथे घेतलीं आहेत.

## परिभाषा

**गण दोन** प्रकारचे आहेत; **अक्षरगण** आणि **मात्रागण**. अक्षरगण **आठ** आहेत, आणि मात्रागण **पांच** आहेत.

## अक्षरगण

### दिंडी

गणामध्ये अक्षरे तीन येती ॥ ऱ्हस्वदीर्घांनीं आठ भेद होती ॥
**य र त न भ ज स म** हीं अशी आठ नांवे ॥ रूप त्यांचे सांगतो आयकावे ६

## अक्षरगणलक्षण

### अभंग

आद्यलघू[2] जो तो **यगण** म्हणावा ॥
**रगण** गणावा मध्यलघू ॥ ७ ॥
अंत्यलघू जो तो **तगण** म्हणावा ॥
**नगण** गणावा सर्वलघू ॥ ८ ॥
आद्यगुरू[3] जो तो **भगण** म्हणावा ॥
**जगण** गणावा मध्यगुरू ॥ ९ ॥

१ तीन अक्षराचा किंवा चार मात्राचा जो समुदाय त्यास **गण** असें म्हणतात. २ ज्याचें पहिलें अक्षर ऱ्हस्व आहे असा. ह्याप्रमाणेंच 'मध्यलघु' इ. शब्द त्या त्या गणांचीं विशेषणे आहेत असें समजावें. ३ ज्याचे पहिले अक्षर दीर्घ आहे असा.

अंत्यगुरू जो तो सगण म्हणावा ॥
मगण गणावा सर्वगुरू ॥ १० ॥

उदाहरण, श्लोक ( अनुष्टुभ् )

य यमाचा न नमन । त ताराप र राधिका ॥
म मानावा स समग । ज जनास भ भास्कर ॥ ११ ॥

या श्लोकांत छंदानुरोधानें गणांचा क्रम साधला नाहीं म्हणून खालीं क्रमानें गण लिहितों.

यमाचा, हा यगण; आद्यलघु ॥
राधिका, हा रगण; मध्यलघु ॥
ताराप, हा तगण; अंत्यलघु ॥
नमन, हा नगण; सर्वलघु ॥
भास्कर, हा भगण; आद्यगुरु ॥
जनास, हा जगण; मध्यगुरु ॥
समग, हा सगण; अंत्यगुरु ॥
मानावा, हा मगण; सर्वगुरु ॥

## लघुगुरुसंज्ञा

श्लोक

ऱ्हस्व स्वरातें लघु बोलताती ॥
दीर्घ स्वरातें गुरु नाम देती ॥
पुढें[1] अनुस्वार विसर्ग येतो ॥
संयोग[2] ऱ्हस्वास गुरुत्व देतो ॥ १२ ॥

---

१ ऱ्हस्व स्वरापुढे जेव्हां अनुस्वार, विसर्ग किंवा संयोग येतो तेव्हां तो त्या ऱ्हस्व स्वरास गुरुत्व देतो असा अर्थ; क्वचित् पदांती ऱ्हस्वास गुरुत्व येतें. २ मध्ये स्वर न आणतां जोडलेल्या अनेक व्यंजनांत एक स्वर मिळविला म्हणजे संयोग अथवा जोडाक्षर होतें.

**हा नियम प्रायः** संस्कृत शब्दांस लागू आहे. जसें—कंक, दुःख, पर्व, पत्र इत्यादि. ह्यांतील पहिलीं ऱ्हस्व अक्षरें गुरु होतात; परंतु प्राकृत शब्दांत तसें नियमानें होत नाहीं. जसें—जंव, तंव, तुझ्या, तिच्या, दुसऱ्या इत्यादि. ह्यांतील मागल्या ऱ्हस्वाक्षराला गुरुत्व येत नाहीं. दोन समान व्यंजनें पुढें असलीं तर मात्र मागील ऱ्हस्वास नियमानें गुरुत्व येतें. जसें—कित्ता, थट्टा, गप्पा, हुद्दा इत्यादि. ह्याचें बीज असे आहे कीं, मागील ऱ्हस्वाक्षरावर जेव्हां पुढील संयुक्ताक्षराच्या योगाने उच्चारणांत आघात येतो तेव्हां त्यास गुरुत्व येतें, एरवीं येत नाहीं. प्राकृतांत 'तुम्ही' ह्या शब्दाचे दोन उच्चार आहेत म्हणजे एक 'तु' वर आघात देऊन आहे. आणि दुसरा त्याशिवाय आहे. जेव्हां आघात असतो तेव्हां 'तु' ह्या ऱ्हस्वाक्षराला गुरुत्व येते; आघात नसतो तेव्हां येत नाहीं. तात्पर्य कीं, संयुक्ताक्षराच्या योगाने मागील ऱ्हस्वाक्षराला गुरुत्व येणें हें त्याच्या आघातावर आहे. प्राकृत शब्दांत कित्येक ठिकाणीं आघात येतो आणि कित्येक ठिकाणीं येत नाहीं, म्हणून "आघात ऱ्हस्वास गुरुत्व देतो" असें म्हटलें तरी चालेल. संस्कृत शब्दांत आघात नेहमीं येतो ह्यामुळें गुरुत्व नेहमीं येते; फारच क्वचित् आघात येत नसेल.

## मात्रालक्षण

**मात्रा** म्हणजे स्वराचे उच्चारास जो काल लागतो तो.

### श्लोक ( अनुष्टुभ् )

लघूची ती एक मात्रा । गुरूच्या दोन मानिती ॥
मात्रावृत्तीं याच रीती । मात्रांनीं गण मोजिती ॥ १३ ॥

लघु अक्षराचें चिन्ह ˘ असें आहे; आणि गुरु अक्षराचें चिन्ह – असें आहे.

## मात्रागण

### आर्या

गण एक एक होतो । मात्रांचा चार चार मात्रांनी ॥
लघुगुरु भेदांनीं ते । मात्रांचे पांच गण होती ॥ १४ ॥

## मात्रागणलक्षण

### आर्या

द्विगुरु[1] **मगण**, ललग[2][3] **सगण** । लगल **जगण**, गलल **भगण**, मनि आणा ॥
चारहि लघु तोचि **नगण** । ऐसे हे पांच गण जाणा ॥ १५ ॥

### उदाहरणें

**मेधा**, हा **मगण**; ह्यांत दोन गुरु आहेत.
**सविता**, हा **सगण**; ह्यांत दोन लघु, एक गुरु अशी क्रमानें अक्षरें येतात.
**जनास**, हा **जगण**; ह्यांत लघु, गुरु, लघु, ,, ,, ,, ,,
**भाजन**, हा **भगण**; ह्यांत गुरु, लघु, लघु, ,, ,, ,, ,,
**नवरस**, हा **नगण**; ह्यांत चारही अक्षरें लघु आहेत.
चार मात्रांचा गण भरावयास ह्या पांचांवांचून कोणताही गण येत नाहीं.

---

## अक्षरगणवृत्तें

अक्षरगणवृत्तांचे तीन भेद करितात. **समवृत्त**, **अर्धसमवृत्त**, आणि **विषमवृत्त.** वृत्ताला प्रायः चार भाग असतात. प्रत्येक भागाला **चरण** किंवा **पाद** म्हणतात. ज्या वृत्ताचे चाऱ्ही चरण सारखे असतात तें **समवृत्त**, ज्याचे प्रथम व तृतीय चरण आणि द्वितीय व चतुर्थ चरण सारखे असतात तें **अर्धसमवृत्त**, आणि ज्याचे चारही चरण भिन्न भिन्न लक्षणांचे असतात ते **विषमवृत्त.** प्राकृत भाषेंत विषमवृत्त प्रायः कोठें आढळत नाहीं. अर्धसमवृत्तें तरी क्वचितच आहेत. समवृत्तें मात्र आहेत.

### श्लोक ( अनुष्टुभ् )

वृत्ताचा जो चतुर्थांश । तयाला **पाद** बोलिजे ॥
पादाच्या लक्षणें सर्व–। वृत्त–लक्षण जाणिजे ॥ १६ ॥

---

१ दोन. २ लघु. ३ गुरु. ४ कांहीं समवृत्तें बहुतेक ग्रंथांत उपलब्ध नाहींत म्हणून यांस गाथा हें नांव द्यावें. उ० ‘ लहु लघू दशरथात्मज मोठा ’ इ० (म. जुनें पां. पु.)

वृत्तें पुष्कळ आहेत. त्यांत कोणतें वृत्त कोणत्या रसाला अनुकूळ, व कोणतें वृत्त कोणत्या रसाला प्रतिकूळ ह्याविषयींही नियम आहेत; परंतु त्यांचा विचार एथें केला नाहीं.

---

## ह्या ग्रंथांतील विशेष संकेत

### श्लोक ( अनुष्टुभ् )

पादार्थी पदही[1] कोठें । गणार्थी संघ घेतला ॥
अक्षरार्थी अवयव । ल[2] ला लघु ग गा गुरु ॥ १७ ॥
अक्षरें गणसंज्ञेचीं[3] । जरी आहेत ऱ्हस्व तीं ।
छंदाच्या अनुरोधानें । कोठें दीर्घहि घातलीं ॥ १८ ॥

### गीति

ज्या वृत्ताचे लक्षण । तें त्या वृत्तींच कथिन मी स्पष्ट ॥
यास्तव होइल कोठें । क्लिष्ट, परी साहतील तें शिष्ट ॥ १९ ॥

### श्लोक ( अनुष्टुभ् )

वृत्त[4] संज्ञा आद्यपादीं । द्वितीयांत गणक्रम ॥
अक्षरें तिसऱ्या पादीं । उदाहरण शेवटीं ॥ २० ॥

एथें लक्षणश्लोकाचा चतुर्थ चरण जरी उदाहरणार्थ आहे, तरी लक्षण पूर्णपणें समजण्यासाठीं प्रत्येक वृत्तास अन्य ग्रंथांतील एकेक आणखी उदाहरण दिलें आहे. क्वचित् अन्य कवीचें उदाहरण न मिळालें तेथें स्वकृत उदाहरण दिलें आहे.

---

१ पद म्हणजे पाद, संघ म्हणजे गण, अवयव म्हणजे अक्षरें. २ ल किंवा ला म्हणजे लघु, आणि ग किंवा गा म्हणजे गुरु असे समजावें. ३ य, र, त, न, भ, ज, स, म, हीं गणसंज्ञेचीं अक्षरें कोठें कोठें या, रा, ता, ना, भा, जा, सा, मा अशीही घातलीं आहेत. ४ हा नियम तरी समवृत्तांविषयी मात्र साधेल.

वृत्तामध्यें **यति** म्हणजे **अवसान** कोणत्या अक्षरावर असावें हें समजण्याकरितां त्या त्या वृत्ताच्या नांवापुढें अंक घातले आहेत आणि ज्याला पादांतीं यति आहे त्यापुढें य० **पा०** असें घातलें आहे.

लक्षणश्लोकाच्या चतुर्थ चरणांत ऱ्हस्व व दीर्घ अक्षरांच्या अनुक्रमें '˘' '–' अशा खुणा व यति समजण्याकरितां '॥' अशी खूण अक्षरांच्या माथ्यावर केली आहे.

या ग्रंथांत पुढें जीं वृत्तें सांगावयाचीं आहेत त्यांच्या पादाक्षरसंख्येवरून जाति देऊन प्रत्येक जातींतील वृत्तांचीं नांवें अनुक्रमानें सांगतोः–

## समवृत्तें

(१) अनुष्टुभ्— पादाक्षरें ८.
१ विद्युन्माला. २ अनुष्टुभ् (केवल)

(२) **बृहती**— पादाक्षरें ९.
३ मणिबंध.

(३) **पंक्ति**— पादाक्षरें १०.
४ चंपकमाला. ६ कामदा.
५ हंसी. ७ मयूरी.

(४) **त्रिष्टुभ्**— पादाक्षरें ११.
८ शुद्ध-कामदा. १३ शालिनी.
९ ललित. १४ दोधक.
१० इंद्रवज्रा. १५ रथोद्धता.
११ उपेंद्रवज्रा. १६ स्वागता.
१२ उपजाति. १७ भद्रिका.

(५) **जगती**— पादाक्षरें १२.
१८ भुजंगप्रयात. १९ द्रुतविलंबित.
२० प्रियंवदा. २५ स्रग्विणी.
२१ वंशस्थ. २६ वैश्वदेवी.
२२ इंद्रवंशा. २७ मालती.
२३ तोटक. २८ यूथिका.
२४ जलोद्धतगति. २९ सारंग.

(६) **अतिजगती**—पादाक्षरें १३.
३० प्रभावती. ३३ मत्तमयूरी.
३१ मंजुभाषिणी. ३४ विभावरी.
३२ प्रहर्षिणी. ३५ चंद्रिका.

(७) **शक्करी**— पादाक्षरें १४.
३६ वसंत-तिलका. ३९ मध्यक्षामा.
३७ प्रहरणकलिका
३८ असंबाधा ४० रुक्मिणी

(८) **अतिशक्करी**— पादाक्षरें १५.
४१ मालिनी. ४३ रमा.
४२ चामर.

(९) अष्टि— पादाक्षरें १६.
 ४४ पंच-चामर. ४५ चित्रवृत्त.

(१०) अत्यष्टि— पादाक्षरें १७.
 ४६ शिखरिणी. ४८ हरिणी.
 ४७ पृथ्वी. ४९मदाक्रांता.

(११) धृति— पादाक्षरें १८.
 ५० विबुधप्रिया.

(१२) अतिधृति—पादाक्षरें १९.
 ५१ शार्दूल-विक्रीडित.

(१३) प्रकृति— पादाक्षरें २१.
 ५२ स्रग्धरा.

(१४) आकृति— पादाक्षरें २२.
 ५३ अमृतध्वनि. ५५ उमा.
 ५४ मंदारमाला.

(१५) विकृति— पादाक्षरे २३.
 ५६ मदिरा. ५८ दुसरी
 ५७ मदिरा किंवा सवाई.
 सवाई.

## अर्धसमवृत्तें

| | | |
|---|---|---|
| ५९ वियोगिनी | विषम चरणांत अक्षरें | १० |
| | सम ,, ,, | ११ |
| ६० माल्यभारा | विषम चरणांत अक्षरें | ११ |
| | सम ,, ,, | १२ |
| ६१ हरिणीप्लुता | विषम चरणांत अक्षरे | ११ |
| | सम ,, ,, | १२ |
| ६२ पुष्पिताग्रा | विषम चरणांत अक्षरे | १२ |
| | सम ,, ,, | १३ |

## जाति अथवा मात्रावृत्तें

(१) गाहू—मात्रा ५४

| | | |
|---|---|---|
| ६३ उपगीति | विषम चरणांत मात्रा | १२ |
| | सम ,, ,, | १६ |

(२) गाथा—मात्रा ५७

| | | |
|---|---|---|
| ६४ आर्या | विषम चरणांत मात्रा | १२ |
| | दु० च० १८, चौ० च० | १५ |

| | |
|---|---|
| ६५ उद्गीति | विषम चरणांत मात्रा १२<br>दु० च० १५, चौ० च० १८ |

(३) उद्गाथा—मात्रा ६०

| | |
|---|---|
| ६६ गीति | विषम चरणांत मात्रा १२<br>सम ,, ,, १८ |

(४) स्कंधक—मात्रा ६४

| | |
|---|---|
| ६७ आर्यागीति | विषम चरणांत मात्रा १२<br>सम ,, ,, २० |

## प्राकृतवृत्तें

६८ अभंग.
६९ दिंडी.
७० साकी.
७१ ओंवी.
७२ घनाक्षरी.
७३ दोहा.
७४ मात्रासमक ( पादाकुलक ).
७५ अंजनीगीत.
७६ बालानंद.
७७ फटका.
७८ चंद्रकांत.
७९ सूर्यकांत.
८० केशवकरणी.
८१ राजहंस.
८२ शारद.
८३ भूपतिवैभव.
८४ अक्रूर.
८५ वधूवल्ली.
८६ यजमान.
८७ पन्ना.
८८ घुंगुरवाळा.
८९ मिरा.
९० मदालसा.
९१ सुनीत.

# समवृत्तें

## ( १ ) जाति—**अनुष्टुभ्** पादाक्षरें ८

### १ विद्युन्माला यति ४, ४

विद्युन्माला ऐसें बोला । जेथें **मा मा गा गा** आला ॥
आठांनीं या पादें व्हावें ॥ श्रीरामातें भावें ध्यावें ॥

चरणांत अक्षरें ८. गण—**म, म, ग, ग.**

**उदाहरण** * ( टीप पहा )

दीनप्रेमा ये तूं रामा ॥ सौख्यारामा[1] हृद्विश्रामा[2] ॥
अंतःसद्मा[3] नैष्टच्छद्मा[4] ॥ संपद्धामा[5] दे मत्कामा[6] ॥ १ ॥

### २ अनुष्टुभ् य० पा०

अनुष्टुप् छंद तें[7] ज्याला ॥ एक नेम नसे गणीं ॥
अक्षरें चरणीं आठ ॥ देवा तार मला त्वरें ॥

चरणांत अक्षरें ८. **गणांचा नियम नाहीं.**

**उदाहरण क्रमिक पुस्तकांतील**

केलें पात्र सुवर्णाचें । कीं विरूपशि खापरी ॥
लावितां तेज संहारी । तम दीपशिखापरी ॥

---

**टीप**—बाहेरच्या उदाहरणांपुढे * अशी खूण आहे.

१. सौख्य+आराम ( बाग ), सौख्याचा केवळ बागच अशा. २ हृत्+विश्राम ( विसांवा ), मनाच्या विसांव्या. ३ अंत करण आहे सद्म (राहण्याचें ठिकाण) ज्याचें अशा, म्हणजे अंतःकरणांत नेहमीं वास करणाऱ्या. ४ कपटरहित अशा. ५ संपत्तीचें केवळ घरच अशा. ६ माझ्या इच्छेला. ७ छंद शब्द संस्कृताप्रमाणें येथें नपुंसक योजिला आहे. ८ अनुष्टुभ् छंदास जरी गणांना नियम नाहीं, तरी प्रतिचरणांचें पांचवें अक्षर लघु व सहावें गुरु असावें आणि सम ( २, ४ ) चरणांचें सातवे अक्षर लघु, व विषम ( १, ३ ) चरणांचे सातवें अक्षर गुरु असावें; तसेंच चरणांच्या आरंभीं **भ**गण किंवा **न**गण येऊं नये; असा प्रायः नियम आहे.

(२) जाति—**बृहती.** पादाक्षरें ९

**३ मणिबंध[1].** य० पा०

त्या मणिबंधातें धरिती ॥ **भा म स** यत्पादा वरिती ।
अक्षरसंख्या यास नऊ ॥ सन्मन लोण्याहून मऊ ॥

चरणांत अक्षरें ९. गण—**भ, म, स.**

**उदाहरण***

द्रव्य मिळावें याकरितां ॥ कां हलक्यांना आर्जवितां ॥
काय नव्हे हो तो धनवान् ॥ ईश रमेचा जो भगवान् ॥ १ ॥

(३) जाति—**पंक्ति.** पादाक्षरें १०

**४ चंपकमाला.** य० ५, ५

चंपकमाला तीस म्हणावें ॥ **भा म स गा** ते जेथ गणावे ॥
पांचदुणी[2] पादाक्षर-संख्या ॥ शीघ्र धरावें सज्जनसख्या ॥

चरणांत अक्षरें १०. गण—**भ, म, स, ग.**

**उदाहरण *‡**

धांव मुकुंदा दुष्टविमर्दा ॥ धांव रमेशा दुःखविनाशा ॥
फार विपत्ती फारच भीती ॥ यांस हरावे सत्वर यावे ॥ १ ॥

**५ हंसी.** य० ४, ६

हंसी ऐसें म्हणतिल तिथें । येती पादीं **म भ न ग** जिथे ॥
एक्या पादीं अवयव[3] दहा ॥ मुक्तीमध्ये चिरसुख पहा ॥

चरणांत अक्षरें १०. गण—**म, भ, न, ग.**

**उदाहरण ***

या संसारीं चेंलच[4] सगळें ॥ आप्त स्नेही तनुधनबळें ॥
विश्वस्रष्ट्याविरहित[5] खरें ॥ विश्वासाचें स्थळ न दुसरें ॥ १ ॥

---

१ ह्या वृत्ताला 'मणिमध्य' असेंही नांव आहे. २ पांचदुणी म्हणजे दहा. ३ अक्षरें. ४ चंचल. ५ जग उत्पन्न करणाऱ्या परमेश्वरावांचून.

‡ हें एक नियमक कवितेचेंही उदाहरण म्हणतां येईल.

### ६ कामदा. य० ५, ५

बोलती कवी तीस कामदा ॥ रा य जा ग हे येति ज्या पदा ॥
अक्षरें तिथें मोजितां दहा ॥ भो दयानिधे वारि ताप हा ॥
चरणांत अक्षरें १०. गण—र, य, ज, ग.

उदाहरण * गोसावीनंदन

घोर हा नको फार कष्टलों ॥ स्वा हितास मी व्यर्थ गुंतलों ॥
वारिं शीघ्र संसारयातना ॥ हे दयानिधे श्रीगजानना ॥ १ ॥

### ७ मयूरी. य० ४, ६

बर्हिस्त्रीसंज्ञा त्या वृत्ता देती । आधीं मा तीन्ही गा अंतीं येती ।
मेळा दाहांचा तो पायीं शोभे ॥ विद्यायुक्तासी सौख्याब्धी लाभे ॥
चरणांत अक्षरें १०. गण—म, म, म, ग.

उदाहरण * मोरोपंत

तो जाऊनी श्रीरामाची सेना । पाहे चित्तीं मी त्याला भासेना ॥
बोले त्यासी वीरश्रीचा कांत । §क्ष्मापुत्रीचा संहर्ता आकांत ॥ १ ॥

विद्युन्माला वृत्ताच्या प्रत्येक चरणांत दोन गुरु अक्षरें घातलीं कीं हें मयूरी वृत्त बनतें.

## (४) जाति—त्रिष्टुभ्. पादाक्षरें ११

### ८ शुद्धकामदा. य० ६, ५

म्हणति तीस बा शुद्धकामदा ॥ न र र ला ग हे येति ज्या पदा ॥
चरणि येति एकादशाक्षरें ॥ नृपतिमस्तकीं छत्रचामरें ॥

---

१ मोर. § क्ष्मा = भूमि. पुत्री = कन्या ( सीता ).

चरणांत अक्षरें ११. गण—न, र, र, ल, ग.

उदाहरण * वामन

प्रगटलासि तूं नंदगोकुळीं ।। म्हणुनि इंदिरावास[1] या स्थळीं ।।
सकळही सुखी या व्रजीं[2] हरी ।। विरहदुःखिता गोपसुंदरी ।। १ ।।

कामदा वृत्तांतील प्रथम दीर्घाक्षराचे ऐवजीं दोन लघु अक्षरें घातलीं कीं, हें **शुद्धकामदा** वृत्त होतें. त्याचप्रमाणें कामदा वृत्तांतीलच सहाव्या गुरु अक्षराऐवजीं दोन लघु अक्षरें घातलीं कीं, पुढील **ललित** वृत्त होतें.

९ **ललित.** य० ५, ६

त्यास हो कवी ललित बोलती ।। **रा ज सा ल गा** चरणि दीसती ।।
पांच आणि सा असति अक्षरें ।। साधु बोलती वचन तें खरें ।।

चरणांत अक्षरें ११. गण—र, ज, स, ल, ग.

उदाहरण स्वकृत

संपदा असे बहुत ज्या घरीं ।। खावया तिथें मिळति सोयरीं ।।
द्रव्य संपतां पळति तेथुनी ।। कोणि पाहिना जवळ येउनी ।। १ ।।

१० **इंद्रवज्रा.** य० पा०

ती इंद्रवज्रा म्हणिजे कवीनें ।। येती **त ता जा ग ग** हे क्रमानें ।।
या अक्षरे येतिल पादि अक्रा ।। मारी अरी जो धरि शंखचक्रा ।।

चरणांत अक्षरें ११. गण—त, त, ज, ग, ग.

उदाहरण * वेणीसंहार नाटक

कां टाकिलें शस्त्र रणांत तेणें[3] ।। साक्षी पृथासूनुच एक जाणे ।।
हें कर्म झालें समरांत जेव्हां ।। होतासि कोठें रणभीरु तेव्हां ।। १ ।।

**इंद्रवज्रा** वृत्तांतील प्रथम दीर्घाक्षराचे ऐवजीं लघु अक्षर घातलें कीं पुढील उपेंद्रवज्रा वृत्त होतें.

---

१ लक्ष्मीचें राहणें. २ गोकुळांत. ३ त्यानें. अश्वत्थामा कर्णास म्हणतो, द्रोणाचार्यानें शस्त्र कां टाकलें हें धर्मराज जाणतो.

## ११ उपेंद्रवज्रा. य० पा०

उपेंद्रवज्रा म्हणतात तीला ॥ ज ता ज गा गा गण येति जीला ॥
पदास होणें शिवें[1] अक्षरांनीं ॥ पहा मनीं धुंडिशि काय रानीं ॥

चरणांत अक्षरें ११. गण—ज, त, ज, ग, ग.

### उदाहरण * रघुनाथ पंडित

तया वनीं एक तटाक तोयें ॥ तुडुंबले तामरसानपायें[2] ॥
निरंतरामंद मरंद वाहे ॥ तपांतही यास्तव रिक्त नोहे ॥ १ ॥

## १२ उपजाति[3]. य० पा०

जेव्हां दिसे मिश्रण इंद्रवज्रा ॥ ह्यांचे पदीं आणि उपेंद्रवज्रा ॥
तेव्हां म्हणावें उपजाति तीला ॥ पतीच हें दैवत हो सतीला ॥

चरणांत अक्षरें ११. गण—सदर ( १० व ११ ).

### उदाहरण

हा बाण गेला वरती मण्याला ॥ धरून पृथ्वीवर आणण्याला ॥
त्याणेंच आला परतून पक्षी ॥ पहा कसा निश्चल रत्न भक्षी ॥ १ ॥

---

१ अकरा. २ तामरस—कमळ. ३ **इंद्रवज्रा** व **उपेंद्रवज्रा** यांच्या मिश्रणाला ज्याप्रमाणें **उपजाति** हें नांव देतात, त्याप्रमाणें कोणत्याहि दोन अथवा तीन वृत्तांच्या मिश्रणाला **उपजाति** हेंच नांव देतात; यास प्रमाण पिङ्गलछन्द:सूत्राचेंच आहे. उदाहरण, श्येवका, कामदा, ललित, शुद्धकामदा इत्यादि किंचित् भेद असलेल्या वृत्तांचें मिश्रण पुढें दिलेल्या पद्यांत आहे:—युद्ध तें कधीं तुम्हि दुणावलें ॥ म्हणुनि राघवें तुम्हांसि धाडिलें ॥ भ्याड ते तुम्ही ठावकें मला ॥ व्यर्थ नाम शत्रुघ्न हें तुला ॥ १ ॥ एक जाउनी सांगती सिते ॥ मांडिला अनर्थ तूझिया सुतें ॥ कर्दळीवनीं अश्व बांधिला ॥ त्यानिमित्त सैन्यभार लोटला ॥ २ ॥ यांपैकीं पहिल्या पद्यांत ललित, शुद्धकामदा व कामदा यांचें मिश्रण आहे, व दुसऱ्यांत श्येनिका व कामदा यांचें मिश्रण आहे. अर्थात् हीं उपजातीचींच उदाहरणें होत.

### १३ शालिनी. य० ४, ७

त्या वृत्ताला शालिनी हेंच नामं ॥ जें मा ता ता गा ग यांचें स्वधाम ।
एक्या पादीं अक्षरें चार सात ॥ सच्छास्त्राचा बोध आणा मनांत ॥

चरणांत अक्षरें ११. गण—म, त, त, ग, ग.

उदाहरण *

मी आत्मा हृत् इंद्रियें देह वाणी ॥ बुद्धी वांच्छा कल्पना वृत्ति यांणीं ॥
जीं जीं केलीं ज्ञात अज्ञात पापें ॥ तीं नाशावीं श्रीहरि स्वप्रतापें ॥ १ ॥

### १४ दोधक. य० पा०

दोधक नांव तयासचि देती ॥ तीन भ, दोन ग हे गण येती ॥
अक्षरमान शिवासम जाणा ॥ सत्वर भेटवि तो यदुराणा ॥

चरणांत अक्षरें ११. गण—भ, भ, भ, ग, ग.

उदाहरण *

सज्जन–पालन पोषण–कर्ता ॥ सत्वर दुस्तर संकटहर्ता ॥
तोच खलांस भयंकर शास्ता ॥ वृत्यनुरूप हरी फलदाता ॥ १ ॥

### १५ रथोद्धता. य० पा०

वृत्त तेंच म्हणती रथोद्धता ॥ रा न रा ल ग असेच तत्त्वतां ॥
रुद्रसंमित पदांत अक्षरें ॥ शास्त्रतत्त्व समजा मनीं खरें ॥

चरणांत अक्षरें ११. गण—र, न, र, ल, ग.

उदाहरण * वामन पंडित

मोकळा करुनि कंठ तेधवां ॥ आठवूनि मनि जानकीधवा ॥
ते रडे भरतही तसा रडे ॥ जोंवरी नयन होति कोरडे ॥ १ ॥

---

१ पादांतीं ऱ्हस्वास गुरुत्व येतें व क्वचित् दीर्घ स्वर ऱ्हस्व मानावा लागतो.
२ अकरा. ३ अकरा. ४ रामास. ५ कौसल्या.

### १६ स्वागता. य० पा०

स्वागता म्हणति सुज्ञ तयाला ॥ रा न भा ग ग असे गण ज्याला ॥
अक्षरेंहि अकरा पदि येती ॥ धन्य ते हरिपदीं मन देती ॥

चरणांत अक्षरें ११. गण—र, न, भ, ग, ग.

**उदाहरण * वामन पंडित**

देखिलें नयनि नंदकुमारा ॥ श्याम सुंदरवरा सुकुमारा ॥
मंद हास्य अतिरम्य मुखाचें ॥ दाखवी स्वमुख नित्य सुखाचे ॥१॥

रथोद्धता वृत्तांतील पहिल्या र गणाबद्दल न गण घातला कीं, पुढील भद्रिका वृत्त होते.

### १७ भद्रिका. य० पा०

म्हणति बुध तिलाच भद्रिका ॥ न न र ल ग हि जीस मुद्रिका[1] ॥
हरमितें[2] पदि अक्षरें गणा ॥ सतत हरिहरी मुखें म्हणा ॥

चरणांत अक्षरें ११. गण—न, न, र, ल, ग.

**उदाहरण * रामचंद्र जोशी**

यदुपतिपदि या मनास रे ॥ धरि तरि भववासना सरे ॥
मिळतिल तुज फार मुद्रिका ॥ वसल करि सदैव भद्रिका[3] ॥ १ ॥

### (५) जाति—जगती. पादाक्षरें १२

### १८ भुजंगप्रयात. य० ६, ६

म्हणावें तयाला भुजंगप्रयात ॥ क्रमानेंच येती य चारी जयांत ॥
पदीं ज्याचिया अक्षरें येति बारा ॥ रमानायका दुःख माझें निवारा ॥

चरणांत अक्षरें १२. गण—य, य, य, य.

**उदाहरण * रामदास**

मना सज्जना भक्तिपंथेंचि जावें ॥ तरी श्रीहरी पाविजेतो स्वभावें ॥
जनीं निंद्य तें कर्म सोडोनि द्यावें ॥ जगीं वंद्य तें सर्वभावें करावें ॥ १ ॥

---

१ गणरचना. २ अकरा. ३ कल्याण.

### १९ द्रुतविलंबित. य० पा०

द्रुतविलंबित वृत्त घडे तिथें ॥ न भ भ र क्रम हा च गणीं जिथें ॥
रविमितें चरणांतिल अक्षरें ॥ त्वरित धर्म करा अपुल्या करें ॥

चरणांत अक्षरें १२. गण—न, भ, भ, र.

**उदाहरण * वामन पंडित**

क्षणभरी जरि देह न सूटता ॥ तटतटां स्थळिचे स्थळि तूटता ॥
बळ असें कळलें खळसत्तमा ॥ दुरुनि लक्षितसे पुरुषोत्तमा ॥ १ ॥

द्रुतविलंबित वृत्तांतील दुसऱ्या भ गणाचे जागीं ज गण घातला कीं पुढील प्रियंवदा वृत्त होतें.

### २० प्रियंवदा. य० ४, ४, ४

कवि भले म्हणति ती प्रियंवदा ॥ न भ ज रा गण असे जिच्या पदा
चरणिचीं असति अक्षरें रवी ॥ न करि तो अनय जो असे कवी ॥

चरणांत अक्षरें १२. गण—न, भ, ज, र.

**उदाहरण स्वकृत**

मुनिजनीं मदनसा दिसे सये ॥ मज गमे वर तुझ्या मनास ये ॥
जनकजेस रिझवूनियां तदा ॥ वदतसे निजसखी प्रियंवदा ॥ १ ॥

उपेंद्रवज्रा वृत्तांतील शेवटच्या दोन गुरु अक्षरांत एक लघु अक्षर मध्यें जास्त घातलें कीं पुढील वंशस्थ वृत्त होतें.

### २१ वंशस्थ. य० पा०

तयास वंशस्थचि नाम ठेविती ॥ जयास जा ता ज र संघ सेविती ॥
पदांत मासांइतकींच अक्षरें ॥ पहा विचारूनि असत्य कीं खरें ॥

---

१ कालियासर्पाचा देह. २ दुष्टामध्ये श्रेष्ठ अशा कालिया सर्पास. ३ बारा. ४ गण.

चरणांत अक्षरें १२. गण—ज, त, ज, र.

उदाहरण * रघुनाथ पंडित

लते तळीं रुंद निरुंद कालवे ॥ गळोनि तेथें मकरंद कालवे ॥
परागही सांद्र तयांत रंगती ॥ फुलांसवें भृगतती तरंगती ॥ १ ॥

वंशस्थ वृत्तांतील प्रथम ज गणाऐवजीं त गण ठेविला कीं, इंद्रवंशा वृत्त होतें.

## २२ इंद्रवंशा. य० पा०

ती इंद्रवंशा कविराज हेरिती ॥ ता ता ज रा हे गण येति ये रिती ॥
पादामधें भानुमितेंच अक्षरें ॥ नाहीं प्रपंचांतिल सौख्य तें खरें ॥

चरणांत अक्षरे १२. गण—त, त, ज, र.

उदाहरण * रामचंद्र जोशी

गोपी हरीच्या भजनांत रगल्या ॥ तें पाहुनी देवि मनांत भंगल्या ॥
हें सौख्य आम्हां न जनांत पातल्या ॥ कीं इंद्रवंशांतहि जन्म घेतल्या ॥१॥

## २३ तोटक. य० पा०

वदती कवि तोटक वृत्त तया ॥ चरणीं से चतुष्टय येत जया ॥
दश आणिक दोन पदाक्षर तीं ॥ दृढ हीं असती तरि कां क्षरती ॥

चरणांत अक्षरें १२. गण—स, स, स, स.

उदाहरण * नवनीत.

जर विस्तृतनेत्र अशी असली ॥ हरिणी तुजला दिसली असली ॥
तर मानवरूपवती हरिणी ॥ चल सत्वर दाखिव ती रमणी ॥ १ ॥

## २४ जलोद्धतगति. य० ६, ६

जलोद्धतगती तिलाच म्हणती ॥ जिथें गण ज सा ज सा च घडती ॥
पदीं असति अक्षरें रविमिती ॥ अनंत सुख तें मुखें वदुं किती ॥

---

१ बारा. २ चार सगण. ३ हीं इंद्रियें. ४ बारा.

चरणांत अक्षरें १२. गण—ज, स, ज, स.

उदाहरण *

अनन्यगतिकां जनां निरखितां ॥ तुझीच करुणार्णवा सदयता ॥
उभी असति त्यापुढें म्हणुनि मी ॥ अनन्यगति होउनी पद नमीं ॥२॥

२५ स्रग्विणी. य० पा०

स्रग्विणी वृत्त हें नांव देती तया । पादि येती र हे संघ चारी जया ॥
होति बारा पदीं अक्षरे मोजितां ॥ सौख्य होतें मना ईश्वरीं योजितां ॥

चरणांत अक्षरे १२. गण—र, र, र, र.

उदाहरण * रामचंद्र जोशी

राधिका रात्रि दारीं उभी राहिली ॥ श्रीधरानें शरत्कालि ती पाहिली ॥
पूर्णचंद्रानना ध्वांतविद्राविणी[1] ॥ पूर्णमासीच मुक्ताफलस्रग्विणी[2] ॥

२६ वैश्वदेवी. य० ५, ७

त्या त्या वृत्ताला बोलती वैश्वदेवी । ज्या ज्या पादीं हे दोनदां मा यँ[3] ठेवी ।
एकैका पादीं अक्षरें येति बारा । मिथ्या मानावा हा प्रपंचीं पसारा ॥

चरणांत अक्षरें १२. गण—म, म, य, य.

उदाहरण * नवनीत

या जन्मामध्यें इंद्रियें देह वाणी ॥ आत्माह्लादांछा कल्पना वृत्ति यांणीं ॥
जीं जीं मीं केलीं ज्ञात अज्ञात पापें । तीं तीं नाशावीं श्रीहरि स्वप्रतापें ॥१॥

प्रियंवदा वृत्तांतील भगणाऐवजीं जगण घातला कीं पुढील मालती वृत्त होतें.

२७ मालती. य० ५, ७

कविजन बोलति तीस मालती ॥ न ज ज र हे गण जीस लागती ॥
भरतिल पादि शरर्षि[4] अक्षरें ॥ त्वरित करा अपुलें तुम्ही बरें ॥

१ अंधार नाहींसा करून टाकणारी. २ मोत्यांची माळ धारण करणारी. ३ दोन मगण व दोन यगण. ४ शर = पांच, ऋषि = सात, मिळून बारा.

चरणांत अक्षरें १२. गण—न, ज, ज, र.

उदाहरण * रामचंद्र जोशी

निशि[1] सुजना तिजला घरीं पहा ॥ नयनसुखावह रत्न हें महा ॥
[2]नगमणि घालुनियां दिसे कशी ॥ कनकलता नवमालती जशी ॥१॥

## २८ यूथिका. य० ३, ८

यूथिका म्हणति वृत्त कवी तया ॥
रा न भा र गण येतिल हे जया ॥
अक्षरें चरणि तीन नऊ पहा ॥
लाभ होइल तुला तरि हा महा ॥

चरणांत अक्षरें १२. गण—र, न, भ, र.

उदाहरण * अनंतकवि

दीर्घ रोदन वनीं लहु आयके ॥
कोण गांजित असे मम अंबिके ॥
बाण तीक्ष्ण सशितीं धनुषीं करीं ॥
येउनी नमुनि बोलत सुंदरी ॥ १ ॥

**स्वागता** वृत्तांतील शेवटच्या दोन गुरु अक्षरांमध्ये एक लघु **अक्षर** घातलें कीं हें **यूथिका** वृत्त होतें.

## २९ सारंग. य० पा०

सारंग हें नांव शोभेल त्यालाच । चारी त कारा पदीं स्थान ज्या साच ।
बारा पहा अक्षरें पादि मोजून । हर्षे प्रभूभक्तसंघास देखून ॥

चरणांत अक्षरें १२. गण—त, त, त, त.

उदाहरण * मोरोपंत.

एवं तदा ऐकतां विप्रवाणीस ।
झाला महातोष काकुत्स्थराणीस ॥

---

१ रात्रीस. २ भूषणें आणि रत्नें.

चित्तीं म्हणे हा मुनि स्तुत्य विश्वास ।
ठेवीं तयाच्या पदीं घट्ट विश्वास ॥ १ ॥

( ६ ) जाति—अतिजगती. पादाक्षरें १३

### ३० प्रभावती. य० ४, ९

प्रभावती म्हणति सुवृत्त तें गुरू[1] ॥
जया पदीं **ज भ स ज** शेवटीं गुरू ॥
पदामध्यें त्रिदशाचि येति अक्षरें ॥
दयानिधी करिलचि आमुचें बरें ॥

चरणांत अक्षरे १३. गण—**ज, भ, स, ज, ग.**

**उदाहरण** *

[2]चराचराप्रति उदयास आणितो ॥
जगत्पती अखिलहि हार्द[3] जाणितो ॥
दयानिधी सकळ विपत्ति वारितो ॥
समर्थ तो शरण जनास तारितो ॥ १ ॥

### ३१ मंजुभाषिणी. य० ५, ८

म्हणती कवी तिसचि मंजुभाषिणी ॥
चरणीं जिच्या **स, ज, स, जा, ग** दाटणी ॥
भरती पदीं त्रिदशसंख्य अक्षरें ॥
ठसवा मनीं सदुपदेश आदरें ॥

चरणांत अक्षरें १३. गण—**स, ज, स, ज, म.**

**उदाहरण** *

रजनीं दिनीं सतत राम हा स्मरा ॥
नयनांसि द्या हरिपदाब्ज आसरा ॥

---

१ श्रेष्ठ. २ चर = जंगम, अचर = स्थावर, चराचराप्रति = स्थावर जंगम पदार्थांस.
३ मनांतील आशय.

श्रवणीं तसा हरिकथौघ हा पडो ॥
परमेश्वरीं मन असेंचि हें जडो ॥ १ ॥

### ३२ प्रहर्षिणी. य० ३, १०

वृत्तातें म्हणति कवि प्रहर्षिणी त्या ॥
आरंभीं **म न ज र** शेवटीं **ग** ये ज्या ॥
एकैका चरणि सदक्षरेंहि तेरा ॥
देवाचें चरित कसें विचित्र हेरा ॥

चरणांत अक्षरें १३. गण—**म, न, ज, र, ग.**

उदाहरण *

अंगानें सरल तसाच तो मनानें ॥
कालानें चल न तसाच तो धनानें ॥
विद्येनें सरस तसाच तो मतीनें ॥
उक्तीनें चतुर तसाच तो कृतीनें ॥ १ ॥

### ३३ मत्तमयूरी[1]. य० ४, ९

त्या वृत्ताला बोलति ते मत्तमयूरी ॥
जेथें येती **मा त य सा गा** गणपूरी ॥
पादीं पादीं अक्षरसंख्या सम तेरा ॥
श्रीरामाच्या पादसरोजीं[2] सुख हेरा ॥

उदाहरण * रामचंद्र जोशी

माता भ्राता तूं भयनाशा सखया जी ॥
गेले स्नाना विप्र तयां अन्न न भाजी ॥
आतां देती शाप सहासी वनि कृष्णा[3] ॥
हाका मारी मत्तमयूरीपरि कृष्णा ॥ १ ॥

---

१ 'मत्तमयूर' असेंही नांव आहे. २ चरणकमलीं. ३ दुर्वास अन्न मागावयास गेला तेव्हां द्रौपदी कृष्णाला हाक मारते.

## ३४ विभावरी. य० पा०

वदति ते कवि तयास विभावरी ॥
**न भ ज जा ग** गण ज्या चरणावरी ॥
त्रिदश जाण चरणांतिल अक्षरें ॥
गुरुवचें करित जा अति आदरें ॥

चरणांत अक्षरें १३. गण—**न, भ, ज, ज, ग.**

### उदाहरण * अनंतकवि

रुदन ते करितसे जनकात्मजा ॥
कुमति ते उपजली कशि आत्मजा ॥
तुरग बांधुनि जित्रावरि ऊठला ॥
पडतसे धरणि होउनि आकुला ॥ १ ॥

## ३५ चंद्रिका. य० ७, ६

म्हणति बुध तिला चंद्रिका साच ती ॥
**न न त त ग** पदीं संघ ज्या दीसती ॥
अवयव चरणीं येति तेरा पहा ॥
भजकसुरतरू सौख्य दे राम हा ॥ १ ॥

चरणांत अक्षरें १३. गण—**न, न, त, त, ग.**

### उदाहरण * मोरोपंत

रघुकुळटिळका मेदिनीपाळका ।
सहृदयपदका पापपंकोदका ॥
सुहृदलिकमला नीरदश्यामला ।
अतुलभुजबला भग्नरक्षोबळा ॥ १ ॥

---

१ जानकी ही रामाचा अश्व लहूनें धरला तेव्हा शोक करिते.

(७) जाति—शक्करी. पादाक्षरें १४

**३६ वसंततिलका[1]. य० पा०**

जाणा वसंततिलकाह्वय तेंच वृत्त ॥
येती जिथें **त भ ज जा ग ग** हे सुवृत्त ॥
संख्या चतुर्दश पदांतिल अक्षरांची ॥
होतें जनांत अपकीर्ति निरक्षरांची ॥

चरणांत अक्षरें १४. गण—**त, भ, ज, ग, ग.**

**उदाहरण * शाकुंतल नाटक**

घोडे कधीं न खळती रविच्या रथाचे ॥
उल्लंघितो पवन भाग सदा नभाचे ॥
भूभार शेष धरि संतत मस्तकांहीं ॥
राजास विश्रम तसा क्षणमात्र नाहीं ॥

**३७ प्रहरणकलिका. य० ७, ७**

प्रहरणकलिका कवि म्हणति तिला ॥
**न न भ न ल ग** हे गण असति जिला ॥
अवयवें[2] चवदा प्रतिपादि भरले ॥
गुरुपद धरितां जन बहु तरले ॥

चरणांत अक्षरें १४. गण— **न, न, भ, न, ल, ग.**

**उदाहरण * रामचंद्र जोशी**

निशिदिनिं रिपुचें भय जरि तुजला ॥
अठिव सतत तूं विषधरसतिला[3] ॥

---

१ ह्या वृत्ताला 'सिंहोद्धता', 'उद्धर्षिणी', 'मधुमाधवी' अशींही नांवें आहेत.
२ अक्षरें. ३ दुर्गेला.

अवन[1] करिल ती जननि तशि सदा ॥
त्यजिल न महिषासुरमथनि कदा ॥ १ ॥

### ३८ असंबाधा. य० ५, ९

त्या वृत्ताला बोलति सुकवि असंबाधा ॥
ज्याच्या पादीं ये **म त न स ग ग** निर्बाधा ॥
एके पादीं ते अवयव भरती चौदा ॥
पुण्याचा तूं लौकर करि मनुजा सौदा ॥

चरणांत अक्षरें १४. **गण—म, त, न, स, ग, ग.**

### उदाहरण * मोरोपंत

मोठे दाते ते तनुधनसह गेले कीं ॥
स्वर्गी त्यांचे भूवरि सुत नुरले लोकीं ॥
गौळीयांतें तो यदुपति दिसतो साधा ॥
भक्ताची जो दूर सहज करितो बाधा ॥ १ ॥

### ३९ मध्यक्षामा. य० ४, १०

मध्यक्षामा सुकवि म्हणति त्या वृत्ताला ॥
पादीं पादीं **म भ न य ग ग** येती ज्याला ॥
एके पादीं अवयव चवदा बा येती ॥
दाते ते जें तनुधन गरिबाला देती ॥

चरणांत अक्षरें १४. **गण—म, भ, न, य, ग, ग.**

### उदाहरण स्वकृत

मोठे दाते तनुधनसह ते गेले कीं ॥
स्वर्गा त्यांचे सुतहि न उरले भूलोकीं ॥

---

१ रक्षण.

गौळीयांतें यदुपति दिसतो तो साधा ॥
सद्भक्तांची सहज दुरवितो जो बाधा ॥ १ ॥

**असंबाधा** वृत्तांतील पांचवें गुरु अक्षर तेथून उचलून त्यापुढील **सहा** लघु अक्षरांच्या पुढें, म्हणजे अकराव्या अक्षराच्या जागीं ठेविलें **कीं, मध्यक्षामा वृत्त** होतें, हें त्या दोन वृत्तांच्या उदाहरणांतील **थोड्याशा फरकावरून सहज लक्षांत येईल.**

४० **रुक्मिणी.** य० ४, १०

तिये दिलें बुधजनि नांव रुक्मिणीचें ।
पदीं असे **ज भ स ज गा ग** संघ साचे ॥
द्विसप्तची अवयव पादि पादि येती ।
खरे जगीं सुखपति साधु संत होती ॥

चरणांत अक्षरें १४. गण—**ज, भ, स, ज, ग, ग.**

**उदाहरण * मोरोपंत**

त्यजावया मज जनहीन काननातें ।
प्रयोजिला अदय सुकंठ[1] कां न नाथें ॥
कुकर्म हें विहित तया वेलीमुखाला[2] ॥
तुझ्या मॅलीमसरुचि[3] पावली मुखाला ॥ १ ॥

( ८ ) जाति—**अतिशक्करी.** पादाक्षरें १५

४१ **मालिनी** य० ८, ७

म्हणति कवि तयाला मालिनी वृत्त तेव्हां ॥
**न न म य य** असे हे संघ येतात जेव्हां ॥
प्रतिचरणिहि पंध्रा अक्षरें हीं तयाचीं ॥
हरिहर–चरणांला आपुलें हीत याचीं ॥

**चरणांत अक्षरें १५. गण—न, न, म, य, य.**

---

१ **सुग्रीव.** २ तोंडावर सुरकुत्या असलेल्या ( वानराला ). ३ **काळिमा.**

**उदाहरण * शाकुंतल नाटक**

तरुवर सुफलांच्या आगमीं नम्र होती ॥
जलदहि जलभारें खालती फार येती ॥
सुपुरुष विनयातें भाग्यकालीं धरीती ॥
उपकृति करि त्यांची जाणिजे हीच रीती ॥

**४२ चामर. य० पा०**

चामराख्य वृत्त तेंच बोलती कवी सदा ॥
जेथ **रा ज रा ज रा** असेच लागती पदा ॥
मोजितां पदांत होति अक्षरें हि पंधरा ॥
पाहतांचि सज्जनास वांकवावि कंधरा[1] ॥

चरणांत अक्षरें १५. गण—र, ज, र, ज, र.

**उदाहरण * रामचंद्र जोशी**

राधिका पहावयास जातसे रमापती ॥
प्राकृतासमान त्यास वृद्ध गोप कोपती ॥
त्यां कळे न हा हरीच गोकुळांत पामरां ॥
नीच मार्[2]जनीसमान मानितात चामरा ॥ १ ॥

**४३ रमा. य० ५, १०**

सुजन रमा कथिति असें पहा सुवृत्त ।
चरण जिचा बघुनि **न जा न रा य** युक्त ॥
प्रतिपदि पंचदशाचि अक्षरें विलोका ।
हरिविण कोण चुकवि तापदा कुलोका[3] ॥

चरणांत अक्षरें १५. गण—न, ज, न, र, य.

**उदाहरण * मोरोपंत**

अथ भरतप्रभृति निजानुजांसि सारें ।
कळवितसे निशि कथिलें जसें स्वचारें ॥

---

१ मान. २ केरसुणी. ३ नरकाला

चरणरजंकरनिच नाशितां अघातें ॥
स्वमत असें कथित असे तदा तिघांतें ॥ १ ॥

( ९ ) जाति—अष्टि. पादाक्षरें १६

४४ पंचचामर. य० पा०

तयास पंचचामराख्य वृत्त बोलती सदा
ज रा ज रा ज गा असेच संघ ज्याचिया पदा ॥
दहा सहा पहा गणून अक्षरें पदांत या ॥
जयाचिया मनासि शांति सौख्य सर्वदा तया ॥

चरणांत अक्षरें १६. गण—ज, र, ज, र, ज, ग.

उदाहरण ❀ वेणीसंहार नाटक

अंजून[1] केश तुमचे विमुक्त नाहिं जाहले ॥
कशी करील बद्ध ही अधींच बाइ आपले ॥
अशा मदीय उत्तरें मनांत फार खोंचली ॥
जणूं गमे तिला उरीं सुरीच काय बोंचली ॥ १ ॥

**चामर** वृत्तांत आरंभीं एक लघु अक्षर जास्त घातलें कीं, वरील **पंचचामर** वृत्त बनतें व चामर वृत्ताच्याच शेवटीं लघु अक्षर घातलें कीं पुढील **चित्रवृत्त** वृत्त तयार होतें.

४५ चित्रवृत्त. य० ८, ८

चित्रवृत्त नांव त्यासि लोक सत्य देति जाण ॥
रा ज रा ज रा ल संघ पादिं येति हें प्रमाण
ज्या पदीं दहा सहाचि अक्षरें पहा गणूनि ॥
राम पादिं भात्र ज्यासि तो तरे भवाब्धितूनि ॥

चरणांत अक्षरें १६. गण—र, ज, र, ज, र, ल.

---

१ द्रौपदीच्या दासीनें दुर्योधनाची स्त्री भानुमती हिला उत्तर केलें आहे.

उदाहरण *

गोपवेष शेषशायि येइ मोष्टिं सृष्टिदूर ॥
पूतना-स्तनासुपान जो करूनि निर्विकार ॥
ऊचली सलील शैल बाल मारि असुपांहि[1] ॥
चित्रवृत्त हें पवित्र वेत्र-पाणि[2] दावि पाहि ॥ १ ॥

( १० ) जाति—अत्यष्टि. पादाक्षरें १७

४६ शिखरिणी. य० ६, ११

तया वृत्ता देती विबुध जन संज्ञा शिखरिणी ॥
जयामध्यें येती य म न स भ ला गा गण गणीं ॥
दहा आणी सात प्रतिचरणि ही अक्षरमिती ॥
विसांवा तो ध्यावा गुरुचरणि सांगू तुज किती ॥

चरणांत अक्षरें १७. गण—य, म, न, स, भ, ल, ग.

उदाहरण * रघुनाथ पंडित

कदा[3] नेणों ओढी शरधितुनि काढी शर कदा ॥
कदा धन्वीं जोडी वरिवरिहि सोडी तरि कदा ॥
विपक्षाच्या वक्षावरि विवरलक्षास्तव रणीं ॥
कळे राजेंद्राची त्वरित शरसंधानकरणी ॥ १ ॥

४७ पृथ्वी. य० ८, ९

सुवृत्त बहु चांगलें म्हणति सुज्ञ पृथ्वी तया ॥
अधीं ज स ज त्यापुढें स य ल गा हि येती जया
पदांत सतरा पहा असति अक्षरें मोजुनी ॥
पदा शरण येति ते तरति कीर्ति ऐशी जुनी

चरणांत अक्षरें १७. गण—ज, स, ज, स, य, ल, ग.

---

१ राक्षसांस. २ वेताची छडी हातांत धरणारा. ३ नळ राजाचें वर्णन आहे.

उदाहरण * मोरोपंत

प्रसाद तुमचा कळानिधिहुनी[1] गुणें आगळा ॥
हरी नतमनोमळा[2] निजसुरद्रुमांचा[3] मळा ॥
करी रत सदा बळानुजपदीं[4] मना चंचळा ॥
सुखेंचि पुरवी लळा सुचिर कीर्ति दे उज्वळा ॥ १ ॥

४८ हरिणी. य० ६, ४, ७

म्हणति हरिणी त्या वृत्ताला पशूंत जशी रुरू[5] ॥
**न स म र स** हे आधीं येती पुढेंच **लघू गुरू** ॥
प्रतिचरणिही येती सत्रा समानचि[6] अक्षरें ॥
शरण गुरुच्या पायां जावें करीलचि तो बरें ॥

चरणांत अक्षरें १७. गण—**न, स, म, र, स, ल, ग.**

उदाहरण * मोरोपंत

अभय दिधलें आहे वाहे शुचि प्रतिभाझरा[7] ॥
विधुमणिचिया[8] सारा तापा कारण पाझरा ॥
जडहि कविता जोडी गोडी गुणीं हरिच्या धरी ॥
सहज तुमचा हीना दीना प्रसाद समुद्धरी ॥ १ ॥

४९ मंदाक्रांता. य० ४, ६, ७

मंदाक्रांता म्हणति तिजला वृत्त तें मंद चाले ॥
ज्याच्या पादीं **म भ न त त** हे आणि **गा** दोन आले ॥
एक्या पादीं गणति सतरा अक्षरांचीच होतें ॥
काढीं रामा भवनदितुनी खातसें फार गोतें ॥

चरणांत अक्षरें १७. गण—**म, भ, न, त, त, ग, ग.**

---

१ चंद्रापेक्षां. २ शरणागतांच्या मनांतील दोषास. ३ आपल्या भक्तांस कल्पतरूंचा. ४ बळरामाचा धाकटा भाऊ कृष्ण ह्याच्या चरणीं. ५ मृगाची एक जात. ६ चारी चरणांत सारखीं. ७ स्फूर्तिरूप झरा म्हणजे प्रवाह. ८ चंद्रकांत मण्याच्या. ९ चंद्र.

उदाहरण * उत्तररामचरित्र नाटक

हा[1]हा देवी हृदय फुटतें देह माझा गळाला ॥
वाटे शून्य त्रिभुवन मला, अंतरात्मा जळाला ॥
या आत्म्यानें किति तरि सदा दुःखभारा धरावें ॥
मोह व्यापी फिरफिरुनि म्यां काय आतां करावें ॥ १ ॥

( ११ ) जाति—धृति. पादाक्षरें १८

**५० विबुधप्रिया.** य० ३, ५, ५, ५

होतसे विबुधप्रियाह्वय वृत्त तें बरवें तिथें ॥
**रा स जा ज भ रा** असे गण येति सा सरसे जिथें ॥
अक्षरें अठराच येतिल पादि मोजुनियां पहा ॥
दीनतारक दुःखहारक शत्रुमारक राम हा ॥ १ ॥

चरणांत अक्षरें १८. गण—**र, स, ज, ज, भ, र.**

उदाहरण * कचेश्वर

भक्तवत्सल दीनमोचन पाव सत्वर तूं हरी ॥
थोर संकट विघ्न उद्भट[2] पातलें मज, केसरी[3] ॥
नक्रगांठिसि सोडुनी पद मोकळें करि यादवा ॥
झोंबला करु काय तस्करें[4] नाकळे मज माधवा ॥ १ ॥

( १२ ) जाति—अतिधृति. पादाक्षरें १९

**५१ शार्दूलविक्रीडित.** य० १२, ७

आहे वृत्त विशाल त्यास म्हणती शार्दूलविक्रीडित ॥
**मा सा जा स त ता ग** येति गण हे पादास कीं जोडित ॥

---

१ सीताविरहामुळें रामचंद्र शोक करतो. २ मोठें, भयंकर. ३ हरि,—हरि म्हणजे सिंह अगर विष्णु. ४ नक्ररूपी तस्कर म्हणजे चोर.

एकोणीस पहा गणूनि चरणीं येतात हीं अक्षरें ॥
तेज:पुंज नभोंगणीं[1] पसरलीं रत्नें पहा नक्षत्रें[2] ॥ १ ॥

चरणांत अक्षरें १९. गण—म, स, ज, स, त, त, त

**उदाहरण * मोरोपंत**

जो लोकत्रितयीं फिरे स्थिर नसे ताटीं जसा पारद[3] ॥
[4]स्वांतध्येयपदींच निश्चल भवांभोधींत[5] जो पार-द[6] ॥
जो वर्णे गगनोदरीं क्षण दिसे पूर्णेंदु कीं शारद[7] ॥
[8]श्रीशांत:पुरचत्वरींच उतरे तो सन्मुनी नारद ॥ १ ॥

( १३ ) जाति—प्रकृति. पादाक्षरें २१.

**५२ स्रग्धरा. य० ७, ७, ७**

कंठीं माळा धरी जी सुरुचिर तिजला स्रग्धरा नाम देती ॥
कंठी वृत्तीं–एकपादीं **म र भ** न य य या हे गण स्पष्ट येती ॥
ज्याच्या प्रत्येक पादीं भरतिल गणितां अक्षरें एकवीस ॥
श्रीरामाचें स्वभद्र स्मरण मग कसें होइना तें कवीस ॥ १ ॥

चरणांत अक्षरें २१. गण—म, र, भ, न, य, य, य.

**उदाहरण * मोरोपंत**

[9]मोझा प्रेमा सुदामा हरिसख दुबळा शब्द–संदोह[10] जो हे ॥
साधूपाशीं [11]श्रुतीनें पदर पसरुनी जोडिले स्वल्प पोहे ॥
या दीनोपायनातें[12] बुधजन भगवान् प्रीतिनें फार गोडी ॥
आणोनी [13]श्रोत्रवक्त्रीं भरिल बहु दया मानुनी तेहि थोडी ॥ १ ॥

---

१ आकाशरूप अंगणांत. २ नक्षत्रे. ३ पारा. ४ परमेश्वरचरणीं. ५ भवसमुद्रांत. ६ पलीकडच्या तीरास लावणारा. ७ शरदृतूंतील. ८ कृष्णाच्या जनानखान्याच्या अंगणांत ( चत्वर+अंगण ). ९ मोरोपंत कवीनें आपला प्रेमा आणि सुदामा ह्यांचें रूपक केलें आहे. १० समुदाय. ११ कानानें. १२ गरिबीच्या भेटीच्या वस्तूस. १३ कर्णरूप मुखांत.

(१४) जाति—आकृति. पादाक्षरें २२

### ५३ अमृतध्वनि. य० ४, ७, ७, ४

सारामृतध्वनि उदारा नरा सुखवि दारा तिलाच म्हणती ॥
**ता भा य जा स र न ग** हेच जेथ **गण** एकैक पादि **गणती** ॥
बेवीस येति चरणीं अक्षरें गणुनि पाहींच संशय जरी ॥
— — ⏑— ॥ ⏑⏑⏑— — — ⏑ — ॥ ⏑⏑⏑ — — ⏑— ॥ ⏑⏑⏑— ॥
रक्षावया परमभक्तास सकटिच दैत्या वधी नरहरी ॥ १ ॥

चरणांत अक्षरें २२. गण—त, भ, य, ज, स, र, न, ग.

उदाहरण * आनंदतनय

मोला[1] करीं हृदयभालासि तें भेरित[2] ज्याला मृगाजिनें[3] कटी ॥
लोलों[4] जटा रुळति दोलोंपरी[5] परम कोलाहलध्वनि उठी ॥
हा लाभ मानुनिच नीलालका[6] सुकृतशीला तयास नमिती ॥
आला मुनी निज घराला म्हणूनि मग झाला पुढें नरपती ॥ १ ॥

### ५४ मंदारमाला. य० ४, ६, ६, ६

मंदारमाला कवी बोलती हीस कोणी हिला अश्वघाटी असें ॥
**साता[7] तकारीं** जिथे हा घडे पाद तेथें **गुरू** एक अंतीं वसे ।
या मोजितां एक पादांत निभ्रांत येतील बेवीस कीं अक्षरें ॥
— —⏑— ॥ — ⏑ — —⏑— ॥ — ⏑ — — ⏑ — ॥ — ⏑ — — ⏑ — ॥
वारावया[8] ताप तारावया यास नारायणा तूंचि ये सत्वरें ॥ १ ।

चरणांत अक्षरें २२. गण—त, त, त, त, त, त, त, ग.

उदाहरण * मोरोपंत

वाचाळ मी नीट पाचारितों धीट याचा नयो वीट साचा हरी ॥
खोटा जरी मी चखोटा मधें तूंचि मोठा कृपेचा न तोटा घरीं ॥
दाता सुखाचा सदा तारिता आपदाताप हे एकदा तापटीं ॥
या संतसेवाव्हया[9] संपदा हे भया संग नाशील या संकटीं ॥ १ ॥

---

१ जनकाच्या घरीं विश्वामित्र गेला, त्याचे वर्णन आहे. २ भस्म. ३ हरिणाचें कातडें. ४ चंचल. ५ झोंपाळयासारख्या. ६ काळया केसांच्या ( स्त्रिया ). ७ सात तगणांनीं. ८ दूर घालीव. ९ संतसेवारूप.

**५५ उमा.** य० ६, ६, ६, ४.

ती उमा कवि बोलति जी बहु आवडती गिरिशास[1] सती ॥
तत्पदिं **सात भ** नामक हे गण शेवटि एक **गुरू** असती ।
बाविस अक्षर दावि सदा पद लागुनि राहिल नेमचि या ॥
मीन जळाविण दीन तसा हरि हीन कृपेविण मी तुझिया ॥ १ ॥

चरणांत अक्षरें २२. गण—**भ, भ, भ, भ, भ, भ, भ, ग.**

**उदाहरण * आनंदतनय**

यापरिचे भवतापविमोचन चापशरांकित[2] भव्यमती ॥
पाहुनि सर्वनृपांहुनि उत्तम लाहुनि तोष पुसे नृपती ॥
कोण असे महिपाळकबाळक हे जगचालकसे सुचले ॥
सांग मला सहसागमनाशय[3] चांग[4] मनांत मला रुचले ॥ १ ॥

(१९) **विकृति.** पादाक्षरें २३

उमा वृत्ताच्या गणांच्या शेवटीं एका गुरु अक्षराची भर घातली कीं **मदिरा वृत्त होतें.**

**५६ मदिरा.** य० ६, ६, ६, ५

ती मदिरा कवि बोलति जी मन मोहुनियां जन लाविल नादीं ॥
ज्या गण **सात भ** नामक आधिच दोन **गुरू** मग येतिल पादीं ॥
अक्षरसंमिति पाहसि तूं जरि तेविस होतिल नेमचि याचा ॥
साधुनि सत्वर घ्या स्वहिता तुम्हि कांहिच नेम नसे स्वत्रयाचा ॥ १ ॥

चरणांत अक्षरें २३. गण—**भ, भ, भ, भ, भ, भ, भ, ग, ग.**

**उदाहरण स्वकृत**

पाहुनि दीनजनांस जळाविण मीन तसा अति दुःखित होतो ॥
कष्टवुनी निजदेह जनां बहु तुष्टवि नित्यचि साधु अहो तो ॥

---

१ शंकरास. २ धनुष्यबाणानीं युक्त. ३ येण्याचा हेतु. ४ चांगले.

जो उपकार करी सुजनावरि अंतरिं निर्मळ भाव धरीतो ॥
साधितसे परकीयहिता परि साधन आत्महितींच करी तो ॥ १ ॥

### ५७ मदिरा किंवा सवाई. य० ६, ६, ६, ५

ठेविति नाम तया मदिरेसचि थोरथोर कविराज सवाई ॥
**चार भकार** पुढें **र न भा ग ग** जेथ जेथ गण येतिल पाईं ॥
यांतहि तेविस अक्षरसंमिति पादि पादिं सम मोजुनि घेईं ॥
सज्जनसंग निरंतर जोडुनि दुष्टसंगतिस सोडुनि देईं ॥ १ ॥
चरणांत अक्षरें २३. गण—**भ, भ, भ, भ, र, न, भ, ग, ग.**

**उदाहरण * मोरोपंत**

राम रघूत्तम कामरिपुप्रिय लोकशोकहर यापरि भावें ॥
दाशरथे तुज होउनियां पदि लीन दीनजनबंधुसि गावें ॥
आमरण स्मृति हेच असो वय याच साच सुपथांत सरावें ॥
दे वरदा वर या शरणाप्रति पापतापजलधीस तरावें ॥ १ ॥

### ५८ दुसरी सवाई. य० ७, ६, ६, ४

कविजन त्या मदिरेसचि लक्षुनि ठेविति नाम सवाइ तिला ॥
**प्रथम नकार** जकार **सहा** मग शेवटि ते **ल ग** येति जिला ॥
भरतिल तेविस अक्षर एक पदीं जरि मोजुनि पाहसि तीं ॥
प्रतिदिन वाढतसे हि उणावतसे विधु पक्षि सितीं[1] असिती[2] ॥ १ ॥

**उदाहरण * मोरोपंत**

शिवहृदयालय[3] कीं सुखदायक निर्जरनायकसेव्यपदा[4] ॥
अभय मला जरि देसि अपाय निवारुनि पाय नमीन सदा ॥
तुज भुजगाभभुजासि[5] असे वर मागतसें वरदान करा ॥
रघुकुलवंशावतंस दशाननसंततिकाननदाहकरा[6] ॥ १ ॥

१ शुक्लपक्षांत. २ कृष्णपक्षांत. ३ महादेवाच्या अंतःकरणांत राहणाऱ्या. ४ इंद्रानें सेवा करण्यास योग्य आहे पद ज्याचें अशा. ५ सर्पासारखे ज्याचे बाहु आहेत अशा तुला. ६ रावणाच्या संततिरूप अरण्याचा दाह करणाऱ्या.

## अर्धसमवृत्तें

### ५९ वियोगिनी ×

विषमीं **स स जा गुरू** असे ॥ समिं **सा भा र ल गा** च येतसे ॥

⏑⏑– ⏑⏑ –⏑⏑– ⏑– ⏑⏑ ––⏑⏑⏑– ⏑⏑–⏑⏑–

विषमीं दश अक्षरां गणीं ॥ समिं एकादश ती वियोगिनी ॥ १ ॥

चरण १ ला, ३ रा—अक्षरें १०. गण—स, स, ज, ग.

चरण २ रा, ४ था—अक्षरें ११. गण—स, भ, र, ल, ग.

### उदाहरण *

प्रभु रामसखा निकेतनीं ॥ मजला त्यागुनि जातसे वनीं ॥
गमतें जग शून्य मन्मना ॥ धरुं मी प्राण कसे वियोगिनी ॥ १ ॥

वियोगिनी वृत्ताच्या प्रत्येक चरणाच्या शेवटीं एक गुरु अक्षर योजिलें कीं, पुढील माल्यभारा वृत्त होतें.

### ६० माल्यभारा ( औपच्छंदसिक )

विषमींच पदीं **स सा ज गा गा** ॥ समपादीं **स भ रा य** येति भागा ॥

⏑⏑– ⏑⏑– ⏑–⏑ –– ⏑⏑ ––⏑⏑–⏑ –⏑––

विषमीं अकरा समींच बारा ॥ तरि संज्ञा तिस होय माल्यभारा ॥१॥

चरण १ ला, ३ रा—अक्षरें ११. गण—स, स, ज, ग, ग.

चरण २ रा, ४ था—अक्षरें १२. गण—स, भ, र, य.

### उदाहरण * प्रसन्नराघव

निजकाव्यरसेंच तृप्त होती ॥ पण काव्यें परकीय साधु गाती ॥
निजपुष्परसें अळे बुडालें ॥ पण तो कुंभजळेंच आम्र डोले ॥ १ ॥

---

× अलीकडे प्राकृत कवितेंत 'अर्धसमवृत्तांत' **वियोगिनी** छंद बराच येऊं लागला आहे. त्याचें लक्षण तात्यांनीं आपल्या ग्रंथांत लिहिलें नाहीं; तें लक्षण आम्हीं त्यांच्या कित्त्याप्रमाणें यथामति नवीन तयार करून वाचकांस वर सादर केलें आहे. हें वृत्त **वैतालीयाचा** एक प्रकार आहे.

## ६१ हरिणीप्लुता

विषमीं **त्रिसकार ल गा** असे ॥ **न भ भ र** क्रम हा च समीं वसे ॥
विषमीं अकरा चरणीं युता ॥ द्विदश अक्षर ती हरिणीप्लुता ॥ १ ॥

चरण १ ला, ३ रा—अक्षरें ११. गण—**स, स, स, ल, ग.**

चरण २ रा, ४ था—अक्षरें १२. गण—**न, भ, भ, र.**

### उदाहरण *

मजला गिरिराज कळीव या ॥ वनलतांत न कीं लपली प्रिया ॥
कृश अंग तिचें अति निर्मळ ॥ प्रिय निरंतर भाषण कोमळ ॥ १ ॥

## ६२ पुष्पिताग्रा

विषमिच चरणीं **न ना र या** हा ॥ **न ज ज र गा** क्रम हा समांत पाहा ॥
द्विदश विषमिं अक्षरें समग्रा ॥ त्रिदश समीं पदि तीच पुष्पिताग्रा ॥१॥

चरण १ ला, ३ रा—अक्षरें १२. गण—**न, न, र, य.**

चरण २ रा, ४ था—अक्षरें १३. गण—**न, ज, ज, र, ग.**

### उदाहरण * रामचंद्र जोशी

नृपजननगरींत सोय पाहा ॥ नृपभजना त्यजुनी घरीं न राहा ॥
नगरिहि भरली दिसे समग्रा ॥ ध्वजशिखरीं लतिकाच पुष्पिताग्रा ॥१॥

---

## जाति

ज्या पद्यांची रचना मात्रागणांनीं समजते त्यांस जाति म्हणतात. या जातींत प्रकार आहेत ते:—५४ मात्रांमिळून होणाऱ्या पद्यास **गाहू;** ५७ मात्रांच्या पद्यास **गाथा;** ६० मात्रांच्या पद्यास **उद्गाथा;** ६२ मात्रांच्या पद्यास **गाथिनी** व ६४ मात्रांच्या पद्यास **स्कंधक** म्हणतात.

### ( १ ) गाहू. मात्रा ५४

### ६३ उपगीतिलक्षण

उपगीतीच्या पहिल्या, तिसऱ्याही द्वादशचि मात्रा ॥
दुसऱ्या आणिक चवथ्या मात्रा पादांत पंध्राची ॥

१ ल्या चरणांत मात्रा १२; २ ऱ्या चरणांत मात्रा १५;
३ ऱ्या चरणांत मात्रा १२; ४ थ्या चरणांत मात्रा १५.

**उदाहरण ***

यत्नें श्रेय कळाया, शास्त्रानुभवहि तसा भावें ॥
सद्गुरुला शरण कपट, दंभहि टाकूनियां जावें ॥

### ( २ ) गाथा. मात्रा ५७

### ६४ आर्यालक्षण

आर्येच्या प्रथमपदीं, द्वादश मात्रा तशाच तिसऱ्याला ॥
अष्टादश दुसऱ्याला, आणिक चवथ्यास पंचदश ॥

१ ल्या चरणांत मात्रा १२; २ ऱ्या चरणांत मात्रा १८;
३ ऱ्या चरणांत मात्रा १२; ४ थ्या चरणांत मात्रा १५.

**उदाहरण * उत्तररामचरित्र नाटक**

नूतन पल्लव फुटला, असला तरु आणिला प्रियेनें तो ॥
लवकर चाखायाला, तोंडाशीं गज पहा नेतो ॥

मात्र आर्या होण्यास एवढेंच लक्षण पुरेसें नाहीं. आर्येत वि
म्हणजे पहिला, तिसरा, पांचवा व सातवा हे गण ज गण नसावे
सहावा गण ज गण अथवा न गण असावा, असा नियम अ
पूर्वार्धांत चार चार मात्रांचा एकेक गण असे सात गण पाडतां ये
आणखी शेवटीं दीर्घ अक्षर असावें. उत्तरार्धांतही चार चार मात्रांचे प
गण असून सहावा गण एकाच लघु अक्षराचा असावा व सातवा ग
चार मात्रांचा असून शेवटीं गुरु अक्षर असावें.

### ६५ उद्गीतिलक्षण

उद्गीतीच्या पहिल्या तिसऱ्याही द्वादशचि मात्रा ॥
दुसऱ्या पादीं पंध्रा, चवथ्या पादांत येति अष्टदश[1] ॥ १ ॥

१ ल्या चरणांत मात्रा १२; २ ऱ्या चरणांत मात्रा १५;
३ ऱ्या चरणांत मात्रा १२; ४ थ्या चरणांत मात्रा १८.

### उदाहरण स्वकृत

देवा मी शरण तुला, आलों मज तूंचि सांभाळीं ॥
तूंचि समर्थ पुसाया, दुर्लिपि माझ्या असेल जी भाळीं ॥

(३) **उद्गाथा.** मात्रा ६०

### ६६ गीतिलक्षण

गीतीच्या प्रथमपदीं द्वादश मात्रा तशाच तिसऱ्याला ॥
दुसऱ्या पादीं अठरा, मात्रा असती तशाच चवथ्याला ॥ १ ॥

१ ल्या चरणांत मात्रा १२; २ ऱ्या चरणांत मात्रा १८;
३ ऱ्या चरणांत मात्रा १२; ४ थ्या चरणांत मात्रा १८.

### उदाहरण मोरोपंत

तरला ययाति राजा, दर्शन होतांच संतरायाचें ॥
सद्दर्शनचि सुदर्शन, करि गट चट कटक अंतरायाचें[2] ॥ १ ॥

**गीतींत** पूर्वार्धांत व उत्तरार्धांतही चार चार मात्रांचे सात **गण** **असून** शेवटीं दीर्घ अक्षर असावें. मात्र विषम **गण ज गण** नसावे व सहावा गण **ज** गण अथवा **न** गण असावा; असा नियम आहेच.

---

१ अठरा. २ विघ्नांचे. वर सांगितलेला **आर्येतील** गणांविषयींचा **नियम** **गीतीं**सही लागू आहे.

(४) **स्कंधक.** मात्रा ६४

### ६७ आर्यागीतिलक्षण

पहिल्या चरणीं बारा मात्रा, दुसऱ्यांत सात आणी तेरा ॥
उभयदळीं हे रीती, जीस तिला म्हणति सुज्ञ आर्यागीती ॥

१ ल्या चरणांत मात्रा १२; २ ऱ्या चरणांत मात्रा २०;
३ ऱ्या चरणांत मात्रा १२; ४ थ्या चरणांत मात्रा २०.

### उदाहरण * मोरोपंत

मी प्रिय करिन सकळत्रा, आहे कीं; व्रज अहो [1]असाध्वंस कळत्रा ॥
[2]विवसा धरि [3]घोरांनीं, रात्रि फिरावें शिवेच्छु न निघो रानीं ॥

आर्येचे **पथ्या, चपला, विपुला** इत्यादि अवांतर भेद पुष्कळ आहेत, ते एथें सांगितले नाहींत.

---

## प्राकृत छंद अथवा वृत्तें

केवळ प्राकृत कवितेंत मात्र येणारे असे जे कांहीं छंद आहेत, त्यांतून प्रसिद्ध ते प्रसंगवशात् एथें सांगतों. ते हे:—**अभंग, दिंडी, साकी, ओंवी,** आणि **घनाक्षरी.**

### ६८ अभंग छंद

अभंग मुख्यत्वें दोन प्रकारचे आहेत. एक मोठा अभंग आणि एक लहान अभंग. त्यांत मोठ्या अभंगाचे प्रकार दोन, आणि लहान अभंगाचे प्रकार तीन, असे सर्व मिळून अभंगाचे पांच प्रकार होतात. ते क्रमानें सांगतों.

### मोठा अभंग

मोठ्या अभंगास चार चरण असतात, त्यांत पहिल्या तीन चरणांस प्रत्येकीं सहा सहा अक्षरें आणि चौथ्या चरणास चार अक्षरें असतात.

---

१ भयरहित. २ रहा. ३ भयंकर प्राण्यांनीं.

**मोठ्या अभंगाचा पहिला प्रकार**:—दुसऱ्या आणि तिसऱ्या चरणांच्या शेवटीं यमक (म्हणजे प्रास) असतें.

**उदाहरण—अभंग तुकारामाचें**

काय वानूं आतां । न पुरे ही वाणी ॥ मस्तक चरणीं । ठेवियेलें ॥ १ ॥
थोरीव सांडिली । आपुली परीसें ॥ धन्य केलें कैसें । लोखंडासी ॥ २ ॥
जगाच्या कल्याणा । संतांच्या विभूति ॥ देह कष्टविती । उपकारें ॥ ३ ॥
भूतांची दया हें । भांडवल संतां ॥ आपुल्या ममता । देहीं नाहीं ॥ ४ ॥
तुका म्हणे सुख । पराचिया सुखें । अमृत हें मुखें । स्रवतसे ॥ ५ ॥

**मोठ्या अभंगाचा दुसरा प्रकार**:—पहिल्या, दुसऱ्या आणि तिसऱ्या चरणांत यमक असतें.

**उदाहरण—अभंग तुकारामाचे**

पंढरीस जावें । जीवन्मुक्त व्हावें ॥ केशवा भेटावें । जीवलगा ॥ १ ॥
जन हे सुखाचे । दिल्या घेतल्याचे ॥ बा अंतकाळींचें । नाहीं कोणी ॥२॥

**लहान अभंगाचा पहिला प्रकार**

**लहान अभंग**

लहान अभंगास दोन चरण असतात.

**लहान अभंगाचा पहिला प्रकार**:—ह्यांत प्रत्येक चरणास आठ आठ अक्षरें असतात. क्वचित् पहिल्या चरणास सहा अक्षरें असतात. दोन्ही चरणांस यमक असतें.

**उदाहरण—अभंग तुकारामाचे**

जरी व्हावा तुज देव । तरी सुलभ उपाव ॥ १ ॥
करीं मस्तक ठेंगणा । लागें संतांच्या चरणा ॥ २ ॥
भावें गावें गीत । शुद्ध करोनियां चित्त ॥ ३ ॥
तुका म्हणे फार । थोडा करीं उपकार ॥ ४ ॥

**लहान अभंगाचा दुसरा प्रकार**:—ह्याच्या दुसऱ्या चरणाचीं सात अक्षरें असून चौथें यमकाक्षर असतें.

**उदाहरण—अभंग तुकारामाचे**

पुढें आतां कैचा जन्म ॥ ऐसा श्रम वारेसा ॥ १ ॥
पांडुरंगा ऐसी नाव ॥ तारि भाव असतां ॥ २ ॥

**लहान अभंगाचा तिसरा प्रकारः**—ह्याला आठ आठ अक्षरांचे चार चार चरण असतात. आणि पहिल्या तीन चरणांच्या शेवटीं यमक असतें.

**उदाहरण—अभंग तुकारामाचे**

देवा पायीं नाहीं भाव ॥ भक्ति वरी वरी वाव ॥
समर्पिला नाहीं जीव ॥ जाणावा हा व्यभिचार ॥ १ ॥

**६९ दिंडी छंद**

दिंडीला चार चरण असतात, आणि चरणाच्या शेवटीं अनुप्रास किंवा यमक असतें. त्यांत तीं कोठें दोन दोन चरणांचीं सारखीं, कोठें चारी चरणांचीं सारखीं अशीं असतात. ह्या छंदास अक्षरांचा नियम नाहीं; पण मात्रांचा नियम आहे. प्रत्येक चरणास एकोणीस मात्रा असतात आणि नवव्या मात्रेवर अवसान असतें; म्हणून नऊ मात्रांचा एक व दहा मात्रांचा एक असे दोन भाग होतात. त्यांच्या मात्रांची रचना अशी असावी कीं, पहिल्या भागांत प्रथम तीन मात्रांचा एक गण, म्हणजे एक गुरु, एक लघु; किंवा एक लघु, एक गुरु; किंवा तीनही लघु असा असावा. त्यापुढें तीन गुरु; किंवा सहा लघु; किंवा लघुगुरु मिळून सहा मात्रांचा गण असावा. दुसऱ्या भागांत पहिल्याप्रमाणें प्रथम तीन मात्रांचा गण, मग पुन्हां तसाच आणखी तीन मात्रांचा गण, व त्यांच्या पुढें म्हणजे शेवटीं दोन गुरु असावे.

**१ लें उदाहरण—रघुनाथ पंडित**

कथा बोलूं हे मधुर सुधाधारा । होय शृंगारा करुणरसा थारा ॥
निषधराजा नळ नामधेय होता । वीरसेनाचा तनय महाहोता ॥ १ ॥

**२ रें उदाहरण—रघुनाथ पंडित.**

चौगुणीनें जरि पूर्ण शीतभानू । नळा ऐसा तरि कळानिधी मानूं ॥
प्रतापाचा जो न मावळे भानू । तयासारीखा कोण दुजा वानूं ॥ १ ॥

## ७० साकी छंद

प्रत्येक साकीला दोन चरण किंवा दोन अर्धें असतात; आणि दोहोंच्या शेवटीं यमक असतें. प्रत्येक अर्धांत चार मात्रांचा एक गण असे सात गण म्हणजे अठ्ठावीस मात्रा असतात. चौथ्या गणाच्या अंतीं म्हणजे सोळाव्या मात्रेवर अवसान असतें. पूर्वी मात्रावृत्तांत मात्रागण पांच प्रकारचे सांगितले आहेत, त्यांतून कोणतेही गण असले तरी चिंता नाहीं; पण गण निरनिराळे मोजतां येतील असे असावे आणि शेवटीं गुरु अक्षर यावें.

### उदाहरण—साक्या, मोरोपंत

श्रीरघुवंशीं ब्रह्मप्रार्थित, लक्ष्मीपति अवतरला
विश्वसहित ज्याच्या जनकत्वें, कौसल्याधव तरला ॥ १ ॥
राखवि सिद्धिसि आश्रमिं जो तो, गाधिज मागुनि ने त्या ॥
शिकवि बलातिबला विद्या शत, अस्त्रें विधिच्या नेत्या ॥ २ ॥
जनकमखातें मुनिसह जातां, प्रभुनें गौतमभार्या ॥
उद्धरिली ती पतिसह पूजी, स्तवुनि अहल्या आर्या ॥ ३ ॥
यश करि भारी भवधनु भंगुनि, हर्षे सीता बाळा ॥
माळा घालुनि वरिती झाली, रामा त्रिजगत्पाळा ॥ ४ ॥

---

## ७१ ओंवी छंद

ओंवीला चार चरण असतात. तीन चरणांच्या शेवटीं यमक असतें. चौथ्याला नसतें. पहिल्या तीन चरणांस आठ आठ अक्षरें आणि शेवटच्या चरणास सात अक्षरें असावीं, हा मुख्य नियम; परंतु शब्द व अर्थ ह्यांच्या अनुरोधानें कवि अधिक उणीं अक्षरें घालतात.

ज्ञानदेवाची ओंवी लहान असते; परंतु एकनाथाची ओंवी ऐसपैस असून शिवाय तिच्या पहिल्या तीन चरणांच्या अंत्याप्रमाणेंच चौथ्या चरणाच्या मध्येंही यमक असतें, हें विशेष आहे. मोठ्या अभंगाचा दुसरा प्रकार व ओंवी हीं सारखींच होत. मोरोपंती सीतागीत वगैरे गीतें व मोठ्या

अभंगाचा पहिला प्रकार हीं सारखींच होत. यावरून ओंवी व अभंग यांचा अन्योन्य संबंध जवळचा आहे हें लक्षांत येईल.

**उदाहरण—ओंवी, ज्ञानदेव**

जो सर्वां भूतांचे ठायीं ॥ द्वेषातें नेणोचि कांहीं ॥
आपपर जया नाहीं ॥ चैतन्या जैसें ॥ १ ॥

**उदाहरण—ओंवी, मुक्तेश्वर**

पौरववंशीं प्रख्यातकीर्ती ॥ दुष्यंतनामा गुणैकमूर्ती ।
श्रेष्ठ भूपाळ चक्रवर्ती ॥ वीर्यें शौर्यें आगळा ॥ १ ॥

**उदाहरण—ओंवी, एकनाथ**

भक्तीस विकला भगवंत ॥ भक्ताचें उच्छिष्ट स्वयें काढित ॥
रणांगणीं घोडे धूत ॥ शेखी[1] होत द्वारपाळ ॥ १ ॥

**उदाहरण—ओंवी, श्रीधर**

यशोदा म्हणे हे जगजेठी ॥ आतां कैंची तुझी भेटी ॥
स्नेहें उमाळे उठती पोटीं ॥ स्तनीं पान्हा फुटलासे ॥ १ ॥

**उदाहरण—ओंवी, रामदास**

आतां वंदूं कवीश्वर ॥ जे शब्दसृष्टीचे ईश्वर ॥
नातरी हे परमेश्वर ॥ वंदावे ते ॥ १ ॥

## ७२ घनाक्षरी छंद

घनाक्षरी छंद ओंवीप्रमाणें आहे; पण तशा चार मिळून एक घनाक्षरी होते. घनाक्षरीला सोळा चरण येतात, चार चरण मिळून तिचा पाद होतो, व प्रत्येक पादाच्या पोटचे चार चरण असतात. त्यांत पहिल्या तीन चरणांतच प्रत्येकीं आठ अक्षरें असून बारा मात्रा असाव्या, आणि चौथ्या चरणांत सात अक्षरें असून अकरा मात्रा असाव्या; असा प्रायः नियम असतो. प्रत्येक पादांत तीन तीन चरणांचीं यमकें आणि प्रत्येक पादाच्या चौथ्या चौथ्या चरणांचीं यमकें असावीं. ह्यास उदाहरणें:—

---

१ शेवटीं.

**उदाहरण—घनाक्षरी, वामनपंडित**

अहा कैकेयी हें काय ॥ केलें तुवां हाय हाय ॥
न म्हणवे तुज माय ॥ जन्मोजन्मीं वैरिणी ॥ १ ॥
सर्वजगदभिराम ॥ वना धाडिला तो राम ॥
केलें विख्यात कुनाम ॥ कीं हे पतिमारिणी ॥ २ ॥
तुझ्या वधें न अधर्म ॥ तुज मारावें हा धर्म ॥
परि निंदील हें कर्म ॥ राम पापकारिणी ॥ ३ ॥
नाहीं तरी प्राण आज्य ॥ तुझे घालोनियां प्राज्य ॥
जाळोनियां सामराज्य ॥ दाखवितों करणी ॥ ४ ॥

**उदाहरण—घनाक्षरी, वामनपंडित**

म्हणे भरत हा राम ॥ त्राहे त्राहे मेघश्याम ॥
वसिष्ठ हा गुरु नाम ॥ तोहि मज कोपला ॥ १ ॥
अंतरले तुझे पाय ॥ तया राज्याचे उपाय ॥
सांगे मज हाय हाय ॥ नव्हे गुरु आपला ॥ २ ॥
अग्नितुल्य वाटे राज्य ॥ मज जाळील साम्राज्य ॥
वरी ऋषि घाली आज्य ॥ त्याने जीव तापला ॥ ३ ॥
दावीं सत्वर चरण ॥ किंवा स्वामी दे मरण ॥
तुझ्या नामाचे स्मरण ॥ त्याचा भाव संपला ॥ ४ ॥

**उदाहरण—घनाक्षरी, मोरोपंत**

विश्वामित्र तपोधन ॥ त्याचें तोषवाया मन ॥
तृषितें तृषिता वन[1] ॥ पीतां द्यावें ज्यापरी ॥ १ ॥
गुरूक्तें दशस्यंदन[2] ॥ रामलक्ष्मण नंदन ॥
अर्पी करूनि वंदन ॥ चित्तीं म्हणे हा परी ॥ २ ॥
बळातिबळाख्या दोन ॥ विद्या हे गुण वदोन ॥
प्रवास राज्यपदोन ॥ न वाटे त्याउपरी ॥ ३ ॥
प्रेमें अस्त्रशतदान ॥ दे रामास बहुमान ॥
गाधिज सत्कथापान ॥ करवी परोपरी ॥ ४ ॥

---

१ पाणी. २ दशरथ राजा.

### उदाहरण—घनाक्षरी, मोरोपंत

मुनि गुरू म्हणे हाण ॥ तोंचि सोडोनि सुबाण ॥
ताटकेचे हरी प्राण ॥ राम लावी न क्षण ॥ १ ॥
सिद्धाश्रमीं निशाचर ॥ सुबाहु प्रमुख खर ॥
संहारी हाणोनि शर ॥ करी यज्ञरक्षण ॥ २ ॥
पुंख-वातें महाशूर ॥ मारीचा उडवी दूर ॥
दैवें नाहीं झाला चूर ॥ तो कीं तें विलक्षण ॥ ३ ॥
विश्वामित्र सभाजन ॥ करी स्तुतीस भाजन ॥
सर्व ऋषि सभाजन ॥ झाले तेव्हां [1]संक्षण ॥ ४ ॥

ह्याशिवाय प्राकृत कवितेंत अनेक प्रकारच्या चालींचीं पदें, कटिबंध, चूर्णिका इत्यादि प्रकार आहेत, त्यांपैकीं आधुनिक कवींनीं विशेष योजिलेले प्रकार संक्षेपानें एथें सांगतों.

### ७३ दोहा

यास चार चरण असतात. हें मात्रावृत्त होय. याच्या विषम चरणांत तेरा तेरा व सम चरणांत अकरा अकरा मात्रा असतात. विषम चरणांत जगण येऊं नये असा नियम आहे. विषम चरणांत सहा, चार व तीन मात्रांचे एकेक गण व सम चरणांत सहा, चार व एक मात्रांचे एकेक गण असतात. याचे **भ्रमरादि** तेवीस प्रकार लघुगुरु अक्षरांच्या संख्यांनीं होतात.

### उदाहरण—मोरोपंत

श्री रामाचें वारितें, पातक सारें नाम ॥
[2]सकृदुच्चारें तारितें, सर्व पुरवितें काम ॥ १ ॥

### ७४ मात्रासमक—पादाकुलक

याचे चार चरण असतात. प्रत्येक चरणांत सोळा मात्रा असतात. याचे पांच मुख्य प्रकार असून सहावा प्रकार त्यांच्या मिश्रणानें होतो, त्यास

---

१ आनंदयुक्त. २ सकृत् = एकदा.

**पादाकुलक** छंद म्हणतात. श्रीशंकराचार्यांचें चर्पटपंजरिका स्तोत्र याच पादाकुलक छंदांत आहे. यांत यति आठव्या मात्रेवर असतो.

उदाहरण—क्रमिक पुस्तकांतील

देवाजीनें करुणा केली । भातें पिकुनी पिवळीं झालीं ॥
देवाजीच्या नांवा घेउनि । तयार व्हा रे करूं कापणी ॥ १ ॥

### ७५ अंजनीगीत

पादाकुलकाच्या तीन ओळी व चौथी ओळ दहा मात्रांची, तींत शेवटचें दीर्घ अक्षर असलें म्हणजे **अंजनी-गीत** होतें. पहिल्या तीन चरणांत आठव्या मात्रेवर यति असतो.

उदाहरण—क्रमिक पुस्तकांतील

नीज नये तर गीत म्हणावें ॥ अथवा झोके देत बसावें ॥
कोण करी हें जीवें भावें ॥ ती माझी आई ॥ १ ॥

### ७६ बालानंद.

हा छंद अत्यंत सुलभ आहे. याच्या प्रत्येक चरणांत चौदा मात्रा असतात. यति आठव्या व चौदाव्या मात्रेवर असतो.

उदाहरण * चंद्रशेखर

हें अवलोकुनि कारंजें ॥ गा हृदया रसिका रंजें ॥ धृ० ॥
रविप्रकाशामाझारी ॥ याचें तेजोमय वारी ॥
चमके, मुकेच गगनाचे ॥ ध्याया थै थै जणुं नाचे ॥
पडुनि चंद्रिका यास करी ॥ धवल हिमाहुनि, नैवलपरी[1] ॥
विलसति किति ह्या जलधारा ॥ शुद्ध रुप्याच्या जणुं तारा ॥१॥

× × ×

केव्हां केव्हां या छंदांत मधून आठ मात्रांचा अंतरा ( आखूड व चाल बदलून म्हणण्याच्या ओळी ) घालून एक प्रकार होतो.

---

१ आश्चर्याचा प्रकार.

उदाहरण * बालकवि ठोमरे

तारकांचें गाणें

कुणि नाहीं गे कुणि नाहीं । आम्हांला पाहत बाई ॥
शांति दाटली चोहिकडे । या गे आतां पुढें पुढें ॥
लाजत लाजत । हळूच हासत ।
खेळ गडे खेळूं कांहीं । कोणीही पाहत नाहीं ॥ १ ॥
फेकुनि द्या इकडे तिकडे । थोडेसे दंवबिंदु गडे ॥
या निर्मळ अवकाशांत ॥ प्रेमाचें पेरूं शेत ॥
मंदयामिनी[1]–॥ सर्वे गुंगुनी ॥
झोप लागली जगताला । या गे आतां खेळुं चला ॥ २ ॥

× × ×

७७ फटका

याच्या प्रत्येक चरणांत तीस मात्रा असून चरणांच्या कांहीं जोड्यां-नंतर बालानंद छंदांतील चौदा चौदा मात्रांच्या ओळींचा अंतरा असतो. यति आठव्या, सोळाव्या, चोविसाव्या व तिसाव्या मात्रेवर असतो.

उदाहरण—क्रमिक पुस्तकांतील

बिकट वाट वहिवाट नसावी । धोपट मार्गा सोडुं नको ॥
संसारामधि ऐस आपला । उगाच भटकत फिरूं नको ॥
चल सालसपण धरुनि निखालस । खोट्या बोला बोलुं नको ॥
अंगि नम्रता सदा असावी । राग कुणावर धरूं नको ॥
नास्तिकपणि तूं शिरुनि जनांचा । बोल आपणा घेउं नको ॥
आल्या अतिथा मुठभर द्याया । मागें पुढतीं पाहुं नको ॥
मायबापांवर रुसूं नको । दुर्मुखलेला असूं नको ॥
व्यवहारामधिं फसूं नको । कधीं रिकामा बसूं नको ॥
जरी उलाढाली भलभलत्या, पोटासाठीं करूं नको ॥

× × ×

---

1 रात्र.

### ७८ चंद्रकांत ( अथवा सुलभा )

या छंदाच्या प्रत्येक चरणांत सव्वीस मात्रा असतात. यति आठव्या, सोळाव्या व सव्विसाव्या मात्रेवर असतो.

**उदाहरण * वनमाळी**

**तारांगण**

निळा सांवळा वाटोळा हा । पाट कुणीं वरतीं ॥
कसा कशावर असा ठेविला धरिला कुणि हातीं ।
टेकियला हा कसा कुणीं गे । पडत कसा नाहीं ॥
कोणीं दिधला टेकु अशाला ? मोठा किति आई ? ॥ १ ॥

× × ×

### ७९ सूर्यकांत ( किंवा राजसा )

मागील छंदांतल्यापेक्षां यांत एक मात्रा जास्त असून तिचे स्थान शेवटच्या गुरु अक्षरापूर्वी असतें.

**उदाहरण ***

**सोंगट्यांचा खेळ—विनायक**

† खेळ मांडिला जगन्नायकें जगत्पटाच्यावरी ॥
मानव नरदा दिवसयामिनी फांसे धरिले करीं ॥
भिन्नत्वास्तव रंग चढविला हिरवा पिवळा वरी ॥
रंगाखालीं साऱ्या नरदा शुष्क लाकडें परी ॥ १ ॥

× × ×

---

† या कवितेत कवीनें विश्वावर सोंगट्यांच्या खेळाचे रूपक केलें आहे. जगद्रूपी पटावर दिवस व रात्र हे फांसे हातांत घेऊन निरनिराळ्या प्रकृतींची माणसें ह्याच जणूं निरनिराळ्या रंगांच्या नरदा ( म्ह. सोंगट्या ) यांनीं ईश्वर खेळत आहे. निरनिराळ्या अहंकारांचें कवच काढले, तर सर्व मनुष्य हीं आंत नुसतीं एकजात कळसूत्री बाहुली असून त्यांस ईश्वर नाचवीत आहे, असा भाव.

### ८० केशवकरणी (अथवा सुरा)

हा अर्धसम छंद होय. याचा पहिला चरण सूर्यकांत छंदाचा असून दुसरा चरण पंधरा अगर सोळा मात्रांचा असतो. यति दर आठव्या मात्रेवर व पादांतीं असतो. या छंदांतील कवितेस 'लावणी' हें जुनें नांव आहे.

**उदाहरण क्रमिक पुस्तकांतील**

⏑ – ⏑ – – ⏑ ⏑ ⏑ – – – – ⏑ ⏑ ⏑ – ⏑ –
किती प्रभूची थोर कृपा ही भूमीवरतीं जला ।
– ⏑ – – ⏑ ⏑ – – ⏑ –
पाडुनी ताप लया लाविला ॥
जाऊं आतां शेतावरतीं जमिन नांगरूं बरी ।
कुळवही फिरवूं तिचियावरी ॥
झाली कीं हो भुसभुशीत बीं फेकूं तिचियामधीं ।
रोप तें करुं या सर्वांअधीं ॥
मनासारिखे भाताचें हें रोपहि आलें जरी ।
पाहिजे पाउस सरिवर सरी ॥ १ ॥
किति ऊन कडक तरि पडलें पहा ।
सुकलीं कीं सर्वांचीं तोंडें अहा ।
कधि कोसळेल समजेना मेघ हा ।
आली आली मुसळधारही देव पावला भला ।
रोप तें सत्वर खणुं या चला ॥ २ ॥

### ८१ राजहंस (किंवा रसतरंगिणी)

या छंदाच्या प्रत्येक चरणांत चौदा मात्रा असतात व अंतराही चौदा मात्रांचा असतो. यति दहाव्या व चौदाव्या मात्रेवर असतो.

**उदाहरण—बा० गोविंदाग्रज**

हें कोण बोललें बोला । राजहंस माझा निजला ॥
दुर्दैव–नगाच्या शिखरीं । नव विधवा दुःखी आई ॥
ते हृदय कसें आईचें । मी उगाच सांगत नाहीं ॥

† जें आनंदेंही रडतें । दुःखांत कसें तें होई ॥
हें कुणीं कुणा सांगावें । * आईच्या बाळा ठावें ॥
प्रेमाच्या गांवा जावें ।
मग ऐकावें या बोला । "राजहंस" माझा निजला

× × ×

## ८२ शारद

या छंदाच्या चरणांत तीस मात्रा असून त्यांचे पांच, आठ, आठ आणि नऊ अशा मात्रांचे चार भाग पडतात. अर्थात् प्रत्येक भागाच्या अंतीं यति असतो. पहिल्या तीन भागांचीं अंत्याक्षरें सयमक असून तीं सर्वच दीर्घ अगर ऱ्हस्व असावीं.

### उदाहरण * तांबे

घरि मुलें । तशीं हीं फुलें । हृड वत्सलें । लोचनें बघणें ॥
कुस्करूं नका हीं सुमनें ॥

× × ×

यां वर्ण । नसे सावर्ण । जों न हीं [1]शीर्ण । तोंवरी धरणें ॥
कुस्करूं नका हीं सुमनें ॥

× × ×

## ८३ भूपतिवैभव

या छंदाच्या चरणांत बावीस मात्रा असतात. दहाव्या मात्रेवर व पादांतीं यति असतो.

---

† पराक्रमी पुत्राच्या राज्याभिषेकोत्सवासारख्या आनंदाच्या प्रसंगाचाही आईचें हृदय मनमुराद उपभोग घेऊं शकत नाहीं. असल्या प्रसंगींही "मी हें स्वप्न तर पाहात नाहीं ना ? हा आनंद चिरकाल टिकेल ना ?" असें लागलीच तिच्या मनांत येऊन त्या बिचारीस निर्भेळ आनंद मिळतच नाहीं.

* प्रत्यक्ष दुःखाच्या प्रसंगीं आईच्या कोमल अंतःकरणाची स्थिति किती हृदय-द्रावक होते, याची कल्पना तिच्या प्रेमाचा प्रत्यक्ष अनुभव घेतलेल्या पुत्रालाच होणें शक्य आहे, असा भाव.

१ क्षीण झालेलीं, कोमेजलेलीं.

**उदाहरण * ना. के. बेहेरे**

**नश्वर देह**

हा देह आपुला क्षणभंगुर टिकणारा ॥
आयुष्य संपतां धुळीस हा मिळणारा ॥ १ ॥
नव पुष्प उगवलें क्षणांत परि कोमजले ॥
तें बहार सरतां सुकुनी गळुनी गेलें ॥ २ ॥
या तारा पडतां प्रकाश क्षणभर पडला ॥
क्षण एक संपतां अंधकारही झाला ॥ ३ ॥

× × ×

## ८४ अक्रूर

हा अर्धसम छंद आहे. विषम चरण वीस मात्रांचा असून समचरण, राजहंस छंदाप्रमाणें, चौदा अथवा क्वचित् सोळा मात्रांचा असतो. विषम चरणांत आठव्या, क्वचित् दहाव्या मात्रेवर यति असून यति असणारें अक्षर दीर्घ असतें.

**उदाहरण—क्रमिक पुस्तकांतील**

⏑ —⏑ —⏑⏑— ⏑⏑ — — ⏑⏑— —
सुतार उत्तमसा तुजसाठीं मिळवीला ॥
—⏑— ⏑⏑⏑ ⏑⏑— —
पाळणा रंगित बनवीला ॥
⏑⏑ — — — —⏑ —⏑ ⏑⏑— —
चहुं बाजूंनीं राघु मोर बसवीले ॥
—⏑ —⏑ —⏑ ⏑⏑— —
पाळण्यांत बाळ निजवीलें ॥
⏑⏑ ⏑⏑ — — —⏑ —⏑ — ⏑⏑ —
निज निज बाळा झोके देत मी तुजला ॥
—⏑— —⏑ ⏑⏑ ⏑⏑ —
खेळुनी बाळ बहु दमला ॥ १ ॥

## ८५ वधूवल्ली

हा छंद फार जुना आहे. पहिल्या चरणांत आठ अगर नऊ मात्रा असतात. दुसऱ्यांत चौदा मात्रा असतात. अंतरा पादाकुलक छंदांत असतो.

उदाहरण * विनायक

गडावर जाऊं । शिवराजदर्शना लाहूं ॥ ध्रु० ॥
भुललों पूर्व विसरलों सारें !
अंगीं भरलें नूतन वारें ।
मूर्खत्वाचे तुटती तारे ।
सत्य तें पाहूं । शिवराजदर्शना लाहूं ॥ १ ॥

× × ×

८६ यजमान (गोविंद) *

याच्या प्रथम चरणांत दहा व द्वितीय चरणांत चौदा मात्रा असतात. क्वचित् चरणांतीं र्‍हस्वाक्षर असल्यास त्याची मात्रा मोजीत नाहींत. पुढील ओळी चंद्रकांत छंदांत असतात.

उदाहरण * मध्वमुनीश्वर

तूं माझा यजमान, रामा, तूं माझा यजमान ॥ ध्रु० ॥
जननीजठरीं रक्षियलें मज, पोसुनि पंचहि प्राण ॥ १ ॥
बाहिर निघतां मातेचे स्तनि पय केलें निर्माण ॥ २ ॥
ऐसे असतां या पोटाची, कां करुं चिंता जाण ॥ ३ ॥
मध्वमुनीश्वर-स्वामि रमापति, धरि माझा अभिमान ॥ ४ ॥

८७ पन्ना

या छंदाच्या प्रत्येक चरणांत चोवीस मात्रा असून सहाव्या, तेराव्या, एकोणिसाव्या व चोविसाव्या मात्रेवर यति असतो. यति असणारीं अक्षरें दीर्घ असतात. नवव्या व तेविसाव्या मात्रेचें अक्षर लघु असतें.

उदाहरण * विनायक

थोर कुलीं जन्म घेती त्यांना जे भूषण ॥
आढळती नीच लोकीं केव्हां ते सद्गुण ॥

* टीप—एकनाथांच्या ‘क्षुधित वनीं गोविंद बाइगे’ या सुंदर पदावरून नांव दिलें आहे.

विलसावी दिव्यता जी राजाच्या मंदिरीं ॥
करिते ती समयिं कोण्या पर्णकुटी साजिरी ॥ १ ॥

× × ×

## ८८ घुंगुरवाळा

या छंदाच्या प्रत्येक चरणांत अठ्ठावीस मात्रा असतात. दहाव्या, सोळाव्या व अठ्ठाविसाव्या मात्रेवर यति असून यति असणारीं अक्षरें दीर्घ असतात.

### उदाहरण * गोविंदाग्रज

* वाजिव रे बाळा । वेल्हाळा[1] । रुमझुम घुंगुरवाळा ॥
अस्फुट विश्वाचें । प्रेमाचें । गाणें आनंदाचें ॥
वदलों जें नादीं । संवादी । तुझिया जन्माआधीं ॥
पहिल्या प्रीतीचे । गमतीचे । कांहींसे भीतीचे ॥
बाळा ते बोल । तूं बोल । आज मनीं जे खोल ॥

× × ×

फार्शी भाषेंतून आलेल्या छंदास चुकीनें गज्जल म्हणतात. गज्जल याचा मूलार्थ प्रेमगीत असा आहे. या छंदांच्या पहिल्या, दुसऱ्या व पुढें प्रत्येक समचरणाच्या शेवटीं यमक बहुधा असतें. पुढें दोन फार्शी छंद दिले आहेत:—

## ८९ आनंदकंद *

हीं फार्शी वृत्तें मूलत: अक्षरसंख्येनें बद्ध आहेत. वाटेल त्या गुरूच्या ठिकाणीं दोन लघु घालून चालणार नाहीं.

### उदाहरण दुसरें ¶ आ० कृ० टेकाडे

आनंदकंद ऐसा । हा हिंददेश माझा ॥ धृ० ॥
सत्यासि ठाव देई । वृत्तीस ठेवि न्यायी ।
सत्त्वासि मानि राजा । हा हिंददेश माझा ॥ १ ॥

---

* आईला आपल्या तारुण्यांतील प्रेमसुखाचें स्मरण होऊन, आपल्या लाडक्याच्या पायांतील घुंगुरवाळयाच्या ध्वनींत आज तें सुख पुन्हां अनुभवास येत आहे असा भाव

१ खेळकर.

¶ **टीप**—रा. टेकाडे यांच्या ‘ आनंदकंद ’ या प्रसिद्ध छंदावरून दिलेलें नांव.

जगदीश जन्म घेई । पदवीस थोर नेई ।
चढवी स्वधर्मसार्जा[1] । हा हिंददेश माझा ॥ २ ॥
गंगाहिमाचलांची । वसती जिथें सदांची ।
होऊनि राहि कलिजा । हा हिंददेश माझा ॥ ३ ॥

× × ×

### उदाहरण पहिलें * मोरोपंत

रसने न राघवाच्या । थोडी यशांत गोडी ।
निंदास्तुती जनांच्या । वार्ता वधूधनांच्या ।
खोट्या व्यथा मनाच्या । कांहीं न यांत जोडी[2] ।

× × ×

### ९० मदालसा

या छंदांत सात सात मात्रांचे चार गण असतात.

### उदाहरण * यशवंत

### कमला

कमलोद्भवे ! कमलासने ! कमलांग—कोमल शोभने ? ।

× × ×

वरदे ! कृपाकर या शिरीं । धरणें जरी तुजला, धरी ।
व्हावी न हातीं माझिया । अनयें[3] कधीं करणी परी ।
स्मित मंद तें मज मोहवी । मज ती कृपादृष्टी हवी ।
परि पापसिंधुदिशेकडे । मतिची नदी नच वाहवी ! ।
अकलंकिता वृत्तीमुळें । जरि ना तुझी दृष्टी वळे ।
रुचतील कंदफळेंमुळें । मज तेंच वैभव.ऑगळें ।
कमलासने ! कमलानने ! । कमलांग-कोमल शोभने ।
करि तूं कृपा अथवा नको । करितों तुला परि वंदनें ! ॥ १ ॥

---

१ शोभेस, अलंकारास. २ लाभ. ३ अन्यायाने. ४ अधिक.

### ९१ सुनीत ( अथवा चतुर्दशक )

हा छंद इंग्रजींतील सॉनेट या प्रकारावरून आपलेकडे आला आहे. याचे चौदा चरण असून ते बहुधा शार्दूलविक्रीडित वृत्तांत असतात. ते क्वचित् दुसऱ्याही एकाद्या दीर्घ वृत्तांत असतात. हा वृत्तप्रकार मूळ इटलींत निघाला. इंग्रजींत याचे दोन प्रकार आहेत. एक पेट्रार्क पद्धतीचे सॉनेट व दुसरें शेक्सपिअरच्या पद्धतीचें सॉनेट. पहिल्या प्रकारांत आठ ओळींचा एक व सहा ओळींचा एक असे दोन भाग पाडतात. दुसऱ्या प्रकारांत बारा ओळींचा एक व दोन ओळींचा एक असे दोन भाग पडतात. हे दोन भाग एकामागून एक येणाऱ्या दोन भावना, दोन प्रसग अगर एकादा प्रसंग व त्यानंतरची भावना व्यक्त करण्यास उपयोगी पडतात. यमकासंबंधानें यांत पुष्कळ प्रकार आहेत. पहिल्या, चौथ्या, पांचव्या व आठव्या ओळींच्या शेवटीं एक; दुसऱ्या, तिसऱ्या, सहाव्या व सातव्या ओळींच्या शेवटीं दुसरें; नवव्या व अकराव्या ओळींच्या शेवटीं तिसरे; सहाव्या व बाराव्या ओळींच्या शेवटीं चौथें आणि तेराव्या व चौदाव्या ओळींच्या शेवटीं पांचवें; अशीं यमकें आणितात. परंतु यापेक्षांही पुष्कळ निराळे प्रकार कवि करीत असतात.

### उदाहरण * केशवसुत

### आम्ही कोण ?

* आम्ही कोण म्हणून काय पुससी ?—आम्ही असूं लाडके ।
देवाचे, दिधलें असे जग तयें आम्हांस खेळावया ॥
विश्वीं या प्रतिभा—बलें[1] विचरतों चोहींकडे लीलया ।
दिक्कालांतुनि आरपार अमुची दृष्टी पहाया शके ॥

---

* या कवितेत कवींचे सामर्थ्य वर्णिले आहे. कवींची कल्पनाशक्ति अकुंठित चालते; तेच आपल्या वर्णनचातुर्यानें सृष्टीस सौंदर्य आणितात; स्वर्गादिक लोक हे कविनिर्मितच होत; जगांतील काव्य व कवि नष्ट झाल्यास बहुतेक आनंद नष्टच होईल असा भाव.

१ प्रतिभा—नवीन नवीन कल्पना करण्याचें सामर्थ्य, स्फूर्ति.

सारेही बडिवार[1] येथिल पहा ! आम्हांपुढें ते फिके ।
पाणिस्पर्शचि आमुचा शकतसे वस्तूंप्रती द्यावया ॥
सौंदर्यातिशया, अशी वसतसे जादू करांमाजि या ।
फोले पाखडितां तुम्ही, निवडितों तें सत्य आम्ही निकें[2] ॥
शून्यामाजि वसाहती वसविल्या कोणीं सुरांच्या बरें ? ।
स्वर्गाची समता धरेस झटती आणावया कोण ते ? ॥
ते आम्हीच, सुधा कृतींमधुनियां ज्यांच्या सदा पाझरे; ।
ते आम्हीच शरण्य[3], मगल तुम्हां ज्यांपासुनी लाभते !
आम्हांला वगळा—गतप्रभ झणीं होतील तारांगणे ।
आम्हांला वगळा—विकेल कवडीमोलावरी हे जिणें ॥ १ ॥

## उपसंहार

हें वृत्त-दर्पण अतज्ज्ञजनार्थ केलें ॥
सुज्ञांसमोर जरि धैर्य धरोनि नेलें ॥
ऐकोन हांसतिल रीति नवीच कानें ॥
हातीं तथापि धरितीलचि कौतुकानें ॥ १ ॥
एथें जें पडलें उणें अधिक तें विद्वज्जनीं साहिजे ॥
प्रेमें पूर्ण कृपा करोनि बरवें केलें तिहीं पाहिजे ॥
जे जे थोर परोपकार-रत त्यां हें योग्य आहे सदा ॥
त्यांचा तो उपकार फारच अम्ही मानूं सदा सर्वदा ॥ २ ॥
धुंडोनियां वृत्त-सुधाकरातें ॥ जे लागले वृत्त-सुधाकरानें ॥
करोनि त्यांचीच सु-वृत्त-माला ॥ समर्पिली म्यां विबुधोत्तमांला ॥ ३
हा ग्रंथ **गोडबोले** उपनामक **परशुराम**तात्यानें ॥
केला वाचायाला ज्याच्या हृदयांत रसिकता त्याने ॥ ४ ॥
सतराशें न्यायशींच्या ॥ संपला रौद्रवत्सरीं ॥
श्रावणाच्या कृष्णपक्षीं ॥ दशमी-भानुवासरीं ॥ ५ ॥

१ मोठेपणाचे डौल. २ खरें. ३ आश्रयस्थान.

# सूचीपत्र

या वृत्तदर्पणांत सांगितलेल्या वृत्तांची अकारादि वर्णानुक्रमानें यादी.


| अनुक्रमांक | नांव | पृष्ठ | अनुक्रमांक | नांव | पृष्ठ |
|---|---|---|---|---|---|
| ८४ | अक्रूर | ५८ | ३५ | चंद्रिका | २९ |
| २ | अनुष्टुभ् ( केवल ) | १६ | ३ | चंपकमाला | १७ |
| ६८ | अभंग | ४६ | ४२ | चामर | ३३ |
| ५३ | अमृतध्वनि | ३९ | ४५ | चित्रवृत्त | ३४ |
| ३८ | असंबाधा | ३१ | २४ | जलोद्धत-गति | २४ |
| ७५ | अंजनी गीत | ५३ | २३ | तोटक | २४ |
| ८९ | आनंदकंद | ६० | ६९ | दिंडी | ४८ |
| ६४ | आर्या | ४४ | १९ | द्रुतविलंबित | २३ |
| ६७ | आर्यागीति | ४६ | १४ | दोधक | २१ |
| १० | इंद्रवज्रा | १९ | ७३ | दोहा | ५२ |
| २२ | इंद्रवंशा | २४ | ४४ | पंचचामर | ३४ |
| ६५ | उद्गीति | ४५ | ८७ | पन्ना | ५९ |
| ६३ | उपगीति | ४४ | ७४ | पादाकुलक | ५२ |
| १२ | उपजाति | २० | ६२ | पुष्पिताग्रा | ४३ |
| ११ | उपेंद्रवज्रा | २० | ४७ | पृथ्वी | ३५ |
| ५५ | उमा | ४० | ३० | प्रभावती | २७ |
| ७१ | ओंवी | ४९ | ३७ | प्रहरणकलिका | ३० |
| ६ | कामदा | १८ | ३२ | प्रहर्षिणी | २८ |
| ८० | केशवकरणी | ५६ | २० | प्रियंवदा | २३ |
| ६६ | गीति | ४५ | ७७ | फटका | ५४ |
| ८६ | गोविंद | ५९ | ७६ | बालानंद | ५३ |
| ७२ | घनाक्षरी | ५० | १७ | भद्रिका | २२ |
| ८८ | घुंगुरवाळा | ६० | १८ | भुजंगप्रयात | २२ |
| ७८ | चंद्रकांत | ५५ | ८३ | भूपतिवैभव | ५७ |

| अनुक्रमांक | नांव | पृष्ठ | अनुक्रमांक | नांव | पृष्ठ |
|---|---|---|---|---|---|
| ३ | मणिबंध | १७ | २१ | वंशस्थ | २३ |
| ३३ | मत्तमयूर | २८ | १ | विद्युन्माला | १६ |
| ९० | मदालसा | ६१ | ५० | विबुधप्रिया | ३७ |
| ५६ | मादिरा | ४० | ३४ | विभावरी | २९ |
| ५७ | मादिरा किंवा सवाई | ४१ | ५९ | वियोगिनी | ४२ |
| ३९ | मध्यक्षामा | ३१ | २६ | वैश्वदेवी | २५ |
| ७ | मयूरी | १८ | ८२ | शारद | ५७ |
| ३१ | मंजुभाषिणी | २७ | ५१ | शार्दूलविक्रीडित | ३७ |
| ४९ | मंदाक्रांता | ३६ | १३ | शालिनी | २१ |
| ५४ | मंदारमाला | ३९ | ४६ | शिखरिणी | ३५ |
| ७४ | मात्रासमक | ५२ | ८ | शुद्ध—कामदा | १८ |
| २७ | मालती | २५ | ५८ | सवाई | ४१ |
| ४१ | मालिनी | ३२ | ७० | साकी | ४९ |
| ६० | माल्यभारा | ४२ | २९ | सारंग | २६ |
| ८६ | यजमान | ५९ | ९१ | सुनीत | ६२ |
| २८ | यूथिका | २६ | ८० | सुरा | ५६ |
| १५ | रथोद्धता | २१ | ७८ | सुलभा | ५५ |
| ४३ | रमा | ३३ | ७९ | सूर्यकान्त | ५५ |
| ८१ | रसतरंगिणी | ५६ | ५२ | स्रग्धरा | ३८ |
| ७९ | राजसा | ५५ | २५ | स्रग्विणी | २५ |
| ८१ | राजहंस | ५६ | १६ | स्वागता | २२ |
| ४[illegible] | रुक्मिणी | ३२ | ४८ | हा[illegible] | ३६ |
| ९ | ललित | १९ | ६१ | हरिणीप्लुता | ४३ |
| ८५ | वधुवल्ली | ५८ | ५ | हंसी | १[illegible] |
| ३६ | वसंततिलका | ३० | | | |


समाप्त